# राजभाषा परिचय

# कार्यरूप व्याकरण

भाषा संचालनालय
महाराष्ट्र शासन

# प्रास्ताविक

१ मे १९६० रोजी महाराष्ट्र राज्याची स्थापना झाल्यानंतर शासनाने राज्याच्या शासकीय कामकाजाची भाषा मराठी राहील हे आपले एक महत्त्वाचे धोरण जाहीर केले. या धोरणाच्या पाठपुराव्याच्या दिशेने टाकलेले पुढचे पाऊल म्हणजे १ मे १९६६ पासून लागू करण्यात आलेला महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ (१९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ५). या अधिनियमामुळे शासनाच्या भाषिक धोरणाची अंमलबजावणी काटेकोरपणे करण्याची जबाबदारी सर्व शासकीय अधिकारी व कर्मचारी यांच्यावर येऊन पडली. यासाठी शासनाच्या सेवेतील सर्व अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना मराठी राजभाषेचे उत्तम ज्ञान असणे आवश्यक होते.

परंतु महाराष्ट्र शासनाच्या सेवेत असलेल्या अमराठी भाषिक अधिकाऱ्यांचे व कर्मचाऱ्यांचे प्रमाण बरेच मोठे आहे. त्यामुळे या भाषिक परिवर्तनाच्या मार्गात अडचणी येणे अपेक्षितच होते. या अडचणी दूर करण्यासाठी शासनाच्या भाषा संचालनालयाने ज्या विविध योजना आखून राबवल्या त्यातील एक महत्त्वाची योजना म्हणजे अमराठी भाषिक शासकीय अधिकारी व कर्मचारी यांना मराठी भाषेचे प्रशिक्षण देणे ही होय. प्रारंभी शासनाने अमराठी भाषिक शासकीय कर्मचाऱ्यांना व अधिकाऱ्यांना मराठी राजभाषेची ओळख करून देणे ही आपलीच जबाबदारी आहे असे मानून राज्यात सर्व विभागांत अशा अधिकाऱ्यांसाठी व कर्मचाऱ्यांसाठी मराठी भाषेच्या प्रशिक्षणाचे वर्ग सुरू केले. हे प्रशिक्षण वर्ग चालू असतानाच्या काळात शिकणारे आणि शिकवणारे या दोघांनाही आलेल्या अडचणींचा बारकाईने अभ्यास करून तत्कालीन

भाषा उपसंचालक **श्री. वे. से. गजेन्द्रगडकर** यांनी अथक परिश्रम करून अमराठी भाषिकांना अतिशय उपयुक्त ठरेल अशा रीतीने **राजभाषा परिचय** नावाच्या एका पुस्तकाची रचना केली. ते पुस्तक भाषा संचालनालयाकडून प्रकाशित करण्यात आले (१९६८).

अमराठी भाषिकांना मराठी भाषेची ओळख करून देणारी अनेक पुस्तके बाजारात उपलब्ध होती परंतु त्या पुस्तकांचे उद्दिष्ट अतिशय मर्यादित होते. शासनव्यवहारासाठी आवश्यक ते सर्वस्पर्शी भाषा ज्ञान देण्यास उपलब्ध पुस्तके समर्थ नव्हती तसेच मराठी भाषेच्या केवळ जुजबी ज्ञानाने कार्यभाग साधणारा नव्हता. मराठी भाषेचे आजचे विस्तारलेले कार्यक्षेत्र त्या पुस्तकांच्या लेखकांच्या चित्तचक्षूंपुढे नव्हते. शासकीय कामकाजात वापरावयाची विशिष्ट लेखन प्रणाली, तांत्रिक परिभाषा, पत्रव्यवहारांचे ठराविक नमुने व प्रकार इत्यादी सर्व बाबींचा साकल्याने विचार करूनच अमराठी भाषिक अधिकारी व कर्मचारी यांना मराठी भाषेचे प्रशिक्षण देणे आवश्यक होते व **राजभाषा परिचय** या पुस्तकाने ती गरज भागवण्याच्या दिशेने बरीच मजल मारली आहे.

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. मभाप–१५६७/१७२९–म, दिनांक ३ ऑगस्ट १९६७ अन्वये शासनाने आपल्या सेवेतील सर्व राजपत्रित अधिकाऱ्यांसाठी आणि शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. मभाप–१५६९–२०९९०–म, दिनांक २१ जून १९६९ अन्वये सर्व अराजपत्रित कर्मचाऱ्यांसाठी मराठी भाषा परीक्षा विहित केल्या. या परीक्षांतील कार्यरूप व्याकरणाच्या प्रश्नपत्रिकेसाठी **राजभाषा परिचय** या पुस्तकाच्या अभ्यासाची शिफारस करण्यात आली.

परंतु या प्रश्नपत्रिकेसाठी **राजभाषा परिचय** या संपूर्ण पुस्तकाच्या अध्ययनाची गरज नसून त्यातील व्याकरणपाठ एवढ्या एका भागाचे अध्ययन पुरेसे आहे असे लक्षात आल्यावरून आणि वाढत्या महागाईमुळे संपूर्ण पुस्तकाची किंमतसुद्धा परीक्षार्थ्यांना परवडेनाशी झाल्यामुळे, त्यातील केवळ

"व्याकरणपाठ" एवढा भागच वेगळा करून तो **कार्यरूप व्याकरण** या नावाने प्रकाशित करून अमराठी भाषिक अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना **राजभाषा परिचय** या पुस्तकापेक्षा कमी किंमतीत उपलब्ध करून देण्यास शासनाची मंजुरी मिळवण्यात आली व त्यानुसार हे **कार्यरूप व्याकरण** परीक्षार्थ्यांसाठी उपलब्ध करून देताना आनंद होत आहे.

**राजभाषा परिचय** या प्रकाशनाची गेल्या एकदोन वर्षांतील अनुपलब्धता आणि वाढती किंमत यांमुळे परीक्षार्थ्यांची जी अडचण होत होती ती या प्रकाशनामुळे दूर होईल असा विश्वास वाटतो.

मुंबई : १ जानेवारी १९८८

प. ग. पाटील
भाषा संचालक,
महाराष्ट्र राज्य.

# अनुक्रमाणिका

# १ वर्तमानकाळ (PRESENT TENSE)

A verb that refers to the present time is said to be in the present tense, *e. g.*, नोकर घरी जातो (A servant goes home); मुलगा व्यायाम करतो (A boy takes exercise).

Now read the following sentences (खालील वाक्ये वाचा) :—

मी सकाळी दूध पितो.
माझी बहीण कोको पिते.
तू सकाळी काय पितोस ?
आम्ही सकाळी चहा पितो.

माझे वडील चहा पितात.
माझा भाऊ दूध पितो.
मी सकाळी दूध पितो.

माझी आई कॉफी पिते.
माझे अनेक मित्र चहा पितात.
तुम्ही सकाळी काय पिता ?

(1) There are three genders in Marathi : Masculine (पुल्लिंग), Feminine (स्त्रीलिंग) and Neuter (नपुसकलिंग). There are also three persons as in English; the first person (प्रथम पुरुष), the second person (द्वितीय पुरुष) and the third person (तृतीय पुरुष).

(2) The words in the bold type in the sentences above are the present tense forms of the verb (क्रियापद) पिणे (to drink).

(3) Every verb (क्रियापद) has a root (धातू); the root of the verb is usually arrived at by dropping the final 'णे' in the verb., *e. g.*, खाणे (to eat) is a verb, 'खा' is the root. Similarly धावणे is the verb, धाव is the root.

We now classify the verbs in the above sentences according to the persons. genders and numbers they govern.

वर्तमानकाळ (Verb खाणे, Root खा)

| | एकवचन (Singular) | अनेकवचन (Plural) |
|---|---|---|
| प्रथम पुरुष (First Person) | मी खातो (M.)<br>मी खाते (F.)<br>(I eat) | आम्ही खातो<br>आपण खातो (M., F.)<br>(We eat) |
| द्वितीय पुरुष (Second Person) | तू खातोस (M.)<br>तू खातेस (F.)<br>(You eat) | तुम्ही खाता<br>आपण खाता (M., F.)<br>(You eat) |

| | एकवचन (Singular) | अनेकवचन (Plural) | |
|---|---|---|---|
| तृतीय पुरुष (Third Person) | तो खातो (M.)<br>(He eats)<br>(भाऊ मित्र) | ते खातात (M.)<br>(भाऊ, मित्र) | They eat. |
| | ती खाते (F.)<br>(She eats)<br>(बहीण) | त्या खातात (F.)<br>(बहिणी) | |
| | ते खाते (N.)<br>(मूल)<br>(It eat) | ती खातात (N.)<br>(मुले) | |

Similarly, the root जा will yield the following forms:—

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथम पुरुष | मी जातो (M.)<br>मी जाते (F.)<br>(I go) | आम्ही जातो<br>आपण जातो (M., F.)<br>(We go) |
| द्वितीय पुरुष | तू जातोस (M.)<br>तू जातेस (F.)<br>(You go) | तुम्ही जाता<br>आपण जाता (M., F.)<br>(You go) |

| | | | |
|---|---|---|---|
| तृतीय पुरुष | तो जातो (M.) (He goes) | ते जातात (M.) | They go. |
| | ती जाते (F.) (She goes) | त्या जातात (F.) | |
| | ते जाते (N.) (It goes) | ती जातात (N.) | |

The verb असणे (to be) gives the following forms in the Present Tense :

| | एकवचन | अनेकवचन | |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | मी आहे (M., F.) (I am) | आम्ही आहोत<br>आपण आहोत (M., F.)<br>(We are) | |
| द्वितीय पुरुष | तू आहेस (M., F.) (You are) | तुम्ही आहात<br>आपण आहात (M., F.)<br>(You are) | |
| तृतीय पुरुष | तो आहे (M.) (He is) | ते आहेत (M.) | They are. |
| | ती आहे (F.) (She is) | त्या आहेत (F.) | |
| | ते आहे (N.) (It is) | ती आहेत (N.) | |

The root अस (to be) also yields optional forms, e.g., असतो, असतात, etc. The root हो (to become) yields होतो etc.

Unlike English, Marathi follws the S. O. V. (Subject, Object, Verb) pattern; that is, in a Marathi sentence, the subject with its enlargements comes first and the verb comes at the end of a sentence. The other parts of speech generally come in between the subject and the verb, e. g., मुलगा आंबा खातो (The boy eats a mango); हुषार मुलगा फार अभ्यास करतो (A clever boy studies hard); अधीक्षक लिपिकावर फार रागावतात (The superintendent gets very angry with the clerk).

Verbs are of two typs : (1) Intransitive (अकर्मक) and (2) Transitive (सकर्मक). The former do not govern a direct object while the latter do. The verb धावतात in the sentence मुले मैदानात धावतात (Boys run on the ground) is an example of the first type; the verb टाकतो in the sentence नोकर पत्र टाकतो (A servant posts a letter) is an example of the second type. In Marathi, the articles 'a', 'an', 'the' are generally not translated, as Marathi does not have articles.

Some verbs and their roots are given below :—

अकर्मक (Intransitive)

१. जाणे (जा) to go
२. येणे (ये) to come
३. धावणे (धाव) to run
४. पडणे (पड) to fall
५. थांबणे (थांब) to stop
६. निजणे (निज) to sleep
७. बसणे (बस) to sit
८. उठणे (उठ) to get up
९. रागावणे (रागाव) to be angry
१०. रडणे (रड) to weep, to cry
११. हसणे (हस) to smile, to laugh
१२. राहाणे (राहा) to live, to stay
१३. लढणे (लढ) to fight
१४. उडणे (उड) to fly
१५. चालणे (चाल) to walk
१६. निघणे (निघ) to start
१७. भांडणे (भांड) to quarrel
१८. असणे (अस) to be

सकर्मक (Transitive)

१. खाणे (खा) to eat
२. पिणे (पि) to drink
३. लिहिणे (लिहि) to write
४. वाचणे (वाच) to read
५. देणे (दे) to give
६. घेणे (घे) to take
७. गाणे (गा) to sing
८. आणणे (आण) to bring
९. फेकणे (फेक) to throw
१०. धुणे (धु) to wash
११. ऐकणे (ऐक) to listen
१२. करणे (कर) to do
१३. शिकणे (शिक) to learn
१४. शिकवणे (शिकव) to teach
१५. विकणे (विक) to sell
१६. दाखवणे (दाखव) to show
१७. पकडणे (पकड) to catch
१८. सांगणे (सांग) to tell

**अभ्यास १**

Translate the following sentences into English (खालील वाक्यांचा इंग्रजीत अनुवाद करा) : —

१. आम्ही येतो.
२. ती बसते.
३. ते रागावतात.
४. मुलगा आंबा खातो.
५. मूल दूध पिते.
६. मुलगी पुस्तक वाचते.

८. मी पडतो.
९. तू भांडतोस.
१०. तो हसतो.
१२. अधीक्षक फाईल आणतात.
१३. आम्ही पाणी आणतो.
१४. तुम्ही अधिकारी आहात.
१५. त्या गाणे गातात.

अभ्यास २

Translate into Marathi (मराठीत अनुवाद करा) :—

1. She sings.
2. The servant sleeps.
3. A bird flies.
4. The child cries.
5. You write a letter.
6. We see a drama.
7. Father brings vegetables.
8. She is a typist.
9. She reads an essay.
10. The player catches a ball.
11. The grocer sells sugar.
12. The teacher shows a picture.
13. He is a student.
14. You are a gentleman.
15. The clerk writes a letter.
16. The grandfather tells a story.

[*New words* (नवीन शब्द) : A servant—नोकर (M.); a bird पक्षी (M.); a child—मूल (N.); a drama—नाटक (N.); a teacher— शिक्षक, गुरुजी, अध्यापक (M.); a player—खेळाडू (M.); a student — विद्यार्थी (M.); a letter—पत्र (N.); a gentleman—सभ्य गृहस्थ (M.); a clerk—लिपिक (M.); a typist—टंकलेखिका (F.); a grandfather—आजोबा (M.); an essay—निबंध (M.); a story—गोष्ट (F.); an officer—अधिकारी (M).]

अभ्यास ३

Use the present tense of the roots given in the brackets to complete the following sentences (खालील वाक्ये पूर्ण करण्याकरिता कंसात दिलेल्या धातूंची वर्तमानकाळी रूपे योजा) :—

१. आम्ही प्रश्न (विचार)
२. तू चित्रपट (पाहा)
३. स्त्रिया कपडे (धू)
४. तो दादरला (राहा)
५. तुम्ही उत्तरे (दे)
६. मुले बाकावर (बस)
७. मी कार्यालयात (जा)
८. वडील कधी कधी (रागाव)
९. आई खाऊ (आण)
१०. तू विद्यार्थी (अस)

अभ्यास ४

Complete the following sentences ( खालील वाक्ये पूर्ण करा ) :--

१. ------ ------- वाचतो.
२. ------ ------- राहातो.
३. ------ ------- उडतात.
४. ------ ------- फेकता.
५. ------ ------- जाते.
६. ------ ------- लिहितात.
७. ------ ------- धुता.
८. ------ ------- आहोत.
९. ------ ------- होतो.
१०. ------ ------- शिकवतात.

[*New words* (नवीन शब्द) : प्रश्न ( M. )--A question; चित्रपट ( M. )--A film, A picture; स्त्री ( F. )--A lady; स्त्रिया--ladies ( Plural of स्त्री ); उत्तर ( N. )--An answer; बाक ( M. )--A bench; कार्यालय ( N. )--An office; कधी कधी Sometimes. ]

● ● ●

# २ नामविचार (NOUNS)

A Noun is a word used as the name of a person, place or a thing, *e. g.*, राम, मुंबई, पुस्तक.

Now read the following paragraph and note the words in the bold type (खालील परिच्छेद वाचा व ठळक शब्दांकडे लक्ष द्या) :–

**मुंबईत** महात्मा गांधी **मार्ग** आहे. तेथे **सुखनिवास** नावाची **इमारत** आहे. या इमारतीत एक **कुटुंब** राहाते. या कुटुंबात चार **माणसे** आहेत. **आई**, **वडील** व दोन **मुले**. वडिलांचे नाव **जीवनजी**, आईचे नाव **सावित्री**, मुलाचे नाव **शंकर** व मुलीचे नाव **हेमा**. आई लवकर उठते व **काम** करते. ती **घराची** **स्वच्छता** ठेवते. वडील **लवकर** उठतात, **तोंड** धुतात व **बागेतील** **फुले** गोळा करतात. सर्वजण **क्रमाने** **स्नान** करतात. वडील **देवाची** **पूजा** करतात, आई **स्वयंपाक** करते, मुले **अभ्यास** करतात. नंतर सर्वजण **जेवण** करतात. वडील **न्यायालयात** काम करतात. मुले **विद्यालयात** जातात. आई **महिलामंडळात** जाते. कुटुंबातील **वातावरण** फार चांगले आहे. या कुटुंबात **आनंद**, **सौजन्य** व **प्रेम** हे गुण दिसून येतात.

मार्ग (M.) A road; इमारत (F.) A building; कुटुंब (N.) A Family; लवकर Early; घर (N.) A house; स्वच्छता (F.) Cleanliness; स्वयंपाक (M.) Cooking; क्रम (M.) An order; अभ्यास (M) Study; न्यायालय (N.) A court; विद्यालय (N.) A school; महिलामंडळ (N.) A ladies' club; वातावरण (N.) Atmosphere; आनंद (M.) Joy; सौजन्य (N.) Courtsey; प्रेम (N.) Affection/love.

The words in the bold type in the passage above are nouns (नामे). In Marathi, there are three kinds of nouns (and not five as in English): (1) Proper Noun (विशेष नाम), (2) Common Noun (सामान्य नाम), (3) Abstract Noun (भाववाचक नाम) (All Material Nouns and Collective Nouns are classed as Common nouns). The nouns in the bold type in the above passage are classified below:–

| Proper Noun (विशेष नाम) | Common Noun (सामान्य नाम) | Abstract Noun (भाववाचक नाम |
|---|---|---|
| मुंबई, महात्मा गांधी, सुखनिवास, जीवनजी, सावित्री, शंकर, हेमा. | मार्ग, इमारत, कुटुंब, माणूस, आई, वडील, मूल, नाव, मुलगा, मुलगी, काम, घर, तोंड, बाग, फूल, क्रम, स्नान, देव, पूजा, स्वयंपाक, अभ्यास, जेवण, न्यायालय, विद्यालय, महिला मंडळ. | स्वच्छता, वातावरण, आनंद, सौजन्य, प्रेम. |

(1) *A Proper Noun* is the name of a particular person or place ( mountain, river, sea, road, book, building, city, etc.), *e. g.*, राम, हिमालय, गोदावरी, अटलांटिक, जनपथ, गीतांजली, ताजमहाल, नागपूर.

(2) *A Common Noun* is a name common to every one of a class of objects, *e. g.*, नदी, पेटी, टोपी, देवालय, रस्ता, फळा, मित्र, घर, दिवस.

(3) *An Abstract Noun* is the name of a property or of a quality either in an individual or in an object, *e. g.*, नम्रता (Modesty), शौर्य ( Bravery ), प्रामाणिकपणा ( Honesty ), सौंदर्य  Beauty ), समाधान ( Satisfaction ). It is easy to distinguish between proper and common nouns. Abstract nouns (भाववाचक नामे) in Marathi are derived in two ways—(1) by the addition of the Sanskrit, terminations य, त्व, ता to some of the nouns and adjectives, *e. g.*, क्रूर (cruel) + य=क्रौर्य ( Cruelty); मित्र + त्व=मित्रत्व (Friendship); कटु (bitter) + ता=कटुता ( Bitterness ); (2) by the addition of Marathi terminations to nouns and adjectives पण, पणा, ई, की, गिरी, *e. g.*, देव + पण = देवपण ( Godliness ); चांगला + पणा=चांगुलपणा ( Goodness); मालक + ई=मालकी (Ownership); आपला + की=आपुलकी (Affinity); गुलाम (a slave) + गिरी=गुलामगिरी (Slavery); सावध ( Cautious ) + गिरी=सावधगिरी ( Cautiousness ).

(1) Proper nouns are sometimes used as Common nouns, e. g., (१) तो आधुनिक कर्ण आहे (कर्ण—name of Pandava's brother; a noble person). (२) आमच्या वर्गात एक कुंभकर्ण आहे ( कुंभकर्ण—name of Ravana's brother; a person who always sleeps).

(2) Common nouns are sometimes used as proper nouns, e. g., जीवन हे मुलाचे नाव आहे (जीवन-- life; water; name of a person).

(3) Sometimes an adjective is used as a noun, *e. g.*, (१) आंधळ्याला पैसा द्या (आंधळा--blind, a blind person). (२) शहाण्याला शब्दाचा मार (शहाणा--Wise, a wise man).

(4) Sometimes an indeclinable (अव्यय) is used as a noun, *e. g.* त्याची वाहवा (indeclinable) झाली (He was praised).

अभ्यास १

Classify the following nouns under the three types of nouns proper, common and abstract :—

भाषा, हात, पाय, वाणी, जून, द्वेष (hatred), परीक्षा, हर्ष (delight), आश्चर्य (surprise), जवाहरलाल, नारळ (A cocoanut), औरंगाबाद, नदी, भूक (hunger), सुतार, सोमवार, प्रेम, तापी, वाईटपणा, सोलापूर, अनुमती (consent), संगम (confluence), तारुण्य (youth).

अभ्यास २

Add to each of the following groups three more nouns of the same kind [illustration : आंबा, पेरू, संत्रे, चिकू, सफरचंद (an apple)] :—

१. सायकल, टांगा, ——————, ——————, ——————.

२. नेमणूक, बढती, ——————, ——————, ——————.

३. टेबल, खुर्ची, ——————, ——————, ——————.

४. सूचना, आदेश ——————, ——————, ——————.

५. लिपिक, अधीक्षक, ——————, ——————, ——————.

६. सुख, दुःख, ——————, ——————, ——————.

७. गाय, घोडा, ——————, ——————, ——————.

८. गुलाब, मोगरा, ——————, ——————, ——————.

Choose the opposites of the following nouns from the list of nouns given at the end :—

१. जन्म, २. मित्र, ३. रात्र, ४. निंदा, ५. नफा, ६. सुख, ७. हिंसा, ८. सज्जन, ९. न्याय, १०. प्रकाश.

(दुःख, दुर्जन, अन्याय, मरण, शत्रू, अंधार, अहिंसा, तोटा, स्तुति, दिवस ).

अभ्यास ४

Fill in the gaps with suitable nouns given at the end :—

१. ———कपडे शिवतो. २. कवी———रचतो. ३. नाटककार——— लिहितो. ४. मुले———उडवतात. ५. पक्षी———बांधतात. ६. पत्नी———करते. ७. कोळी———पकडतो. ८. अधीक्षक———तपासतात. ९. ———टंकलेखन करतात. १० आम्ही———वाचतो. ११. सूर्य———देतो. १२. शेतकरी———नांगरतो.
(ploughs)

[टंकलेखक (A typist), स्वयंपाक, घरटे, कादंबरी, टिप्पणी, शेत, प्रकाश, पतंग, शिंपी, नाटक, मासे, कविता.]

अभ्यास ५

Translate the following sentences into Marathi (Illustration : Bombay is a city—मुंबई हे शहर आहे) :—

(1) Poona is a city. (2) Metro is a theatre. (3) Matheran is a hill-station. (4) Tea is a drink. (5) 'Hamlet' is a play. (6) Kabaddi is a game. (7) A parrot is a bird. (8) Rose is a flower. (9) Gold is a metal. (10) Wisdom is a an abstract noun.

[*New words* : Poona —पुणे; a city—शहर (N); a theatre—चित्रपटगृह (N.); a hill-station—थंड हवेचे ठिकाण (N.); a parrot—पोपट (M.); gold—सोने (N.); a metal—धातू (M.); a drink—पेय (N.); a play—नाटक (N.); a game —खेळ (M.).]

अभ्यास ६

Translate the following sentences into Marathi :—

(1) We offer co-operation. (2) A soldier displays bravery. (3) An officer holds an enquiry. (4) The boy reads an advertisement. (5) An

examiner examines an answer-book. (6) The Superintendent reads the draft. (7) The servant shuts the door. (8) The farmer sows seeds. (9) A student performs an experiment. (10) A boy commits a mistake.

[ *New words* : co-operation—सहकार्य (N.); to display—दाखविणे; bravery—शौर्य (N.); an enquiry—चौकशी (F.); an advertisement—जाहिरात (F.); to examine—तपासणे; an answer-book—उत्तरपत्रिका (F.); a draft—मसुदा (M.); to shut—बंद करणे; to sow—पेरणे; a seed—बी (N.); an experiment—प्रयोग (M.); a mistake—चूक (F.).]

❁ ❁ ❁

# ३ लिंगविचार (GENDERS)

In the last chapter, we studied different kinds of nouns. Every noun has a gender (लिंग), a number (वचन) and a case (विभक्ती). In this chapter, it is proposed to consider genders in Marathi. It may be stated that genders of nouns in Marathi are generally determined more by practice and usage than by specific rules. In the absence of precise rules, the best way to learn genders is by practice alone.

Notice, *e.g.* the three nouns फळा (a black-board), खुर्ची (a chair) and टेबल (a table). All the three articles are made of wood and yet the three nouns have three different genders Masculine, Feminine and Neuter, respectively. Hence, it is proposed to give mere indications, by way of guidance only. They may help the learner to recognize the genders of Marathi nouns.

Now read the following paragraph :—

**पुणे** येथे **टिळकपथ** आहे. तेथे एक माध्यमिक **विद्यालय** आहे. **मुले** विद्यालयात शिकतात. विद्यालयाची **इमारत** भव्य आहे. **सकाळ दुपार** दोन वेळा **वर्ग** भरतात. **शिपाई घंटा** देतो. मुले **प्रार्थना** म्हणतात. **शिक्षक** वर्गात जातात. येथे **शिक्षिका** नाहीत. **संस्कृत, शास्त्र, इतिहास, गणित, भाषा** वगैरे **विषय** येथे शिकवतात. **विद्यार्थी वह्या** व **पुस्तके** आणतात. **सोमवार** ते **शुक्रवार** पूर्ण **वेळ शाळा** चालते. **मे महिना** म्हणजे मुलांचा **आनंद.**

We shall now classify the nouns in bold type in this passage, under the three different genders :

| Masculine Nouns (पुल्लिंगी नामे) | Feminine Nouns (स्त्रीलिंगी नामे) | Neuter Nouns (नपुसकलिंगी नामे) |
|---|---|---|
| टिळकपथ, वर्ग, शिपाई, शिक्षक, इतिहास, विषय, विद्यार्थी, सोमवार, शुक्रवार, मे, महिना, आनंद. | इमारत, सकाळ, दुपार, घंटा, प्रार्थना, शिक्षिका, भाषा, वही, वेळ, शाळा. | पुणे, विद्यालय, मूल, संस्कृत, शास्त्र, गणित, पुस्तक. |

The above classification does not reveal any general rules for fixing the genders of nouns. We can at the most say that शिक्षक, विद्यार्थी and शिपाई are nouns denoting the male kind; hence, they are in the masculine gender; the word शिक्षिका is a noun denoting the female kind and is, therefore, in the feminine gender. It is, therefore, proposed to give a few hints that may help the reader to decide the gender of Marathi nouns. The following may prove useful :—

**Nouns (नामे)**

Masculine gender (पुल्लिंगी)

(1) Nouns denoting the male kind, *e.g.*—
वडील, अध्यापक, विद्यार्थी, मुलगा, पक्षी, कवी, हत्ती, नट, धोबी, शेजारी.

(2) Marathi nouns ending in आ, *e.g.*—
आंबा, खांदा, घसा, वारा, रस्ता, कांदा, पैसा, दिवा, भत्ता, महिना, देखावा, आरसा, किनारा, रुपया, फायदा, पुतळा, पुरावा, पडदा, नमुना, मसुदा, खुलासा, पुरवठा, आराखडा, राजीनामा, गोषवारा, ठावठिकाणा (whereabouts), कायदा, वायदा, घोडा, तबेला, गोठा, हिवाळा, पावसाळा, उन्हाळा.

Feminine gender (स्त्रीलिंगी)

Nouns denoting the female kind, *e.g.*—
आई, अध्यापिका, विद्यार्थिनी, मुलगी, पक्षीण, कवयित्री, हत्तीण, नटी, धोबीण, शेजारीण.

(a) Sanskrit nouns ending in आ, *e.g.*—
कथा, सभा, विद्या, भाषा, भार्या, प्रजा, पूजा, यात्रा, निंदा, वार्ता, शोभा, शंका, आशा, सेवा, चिंता, गुहा, हिंसा, सत्ता, श्रद्धा (faith), संस्था, परीक्षा, सूचना, प्रतिभा ( inspiration ), प्रार्थना, प्रशंसा, वेदना, भावना, मर्यादा, योजना, रचना, यंत्रणा ( machinery), व्यवस्था, मान्यता, सुधारणा, अनुकंपा (compassion), गुणवत्ता (merit), अनुक्रमणिका, दक्षता, कार्यक्षमता.

(b) Nouns derived from Urdu, Hindi etc. and ending in आ, *e.g.*—
इजा, सुभा, जमा, पागा, थट्टा, रजा, सजा, जागा, मजा, पर्वा.

Neuter gender (नपुसकलिंगी)

Nouns denoting either, *e.g.*—
मूल, भावंड, मांजर, गाढव.

| Masculine gender (पुल्लिंगी) | Feminine gender (स्त्रीलिंगी) | Neuter gender (नपुसकलिंगी) |
|---|---|---|
| (3) Nouns ending in ई, *e.g.*— | | |
| मणी (bead), मोती, (pearl). | शाई, तिथी, दाढी, गाडी, नदी, खुर्ची, टोपी, पोळी, उडी, चोरी, माती, वाणी (speech), छत्री, भाजी, मती, बुद्धी, रीती, भीती, भक्ती, दृष्टी, सृष्टी, शक्ती, प्रीती, टेकडी, लेखणी, काकडी, भाकरी, माहिती, मजुरी, ओहोटी, भरती, फिरती, वाटणी, चौकशी, समिती, विनंती, खरेदी, प्रगती, तपासणी, विसंगती, सरासरी, सहमती (concurrence), वस्तुस्थिती, कार्यवाही, जबाबदारी, हातचलाखी. | पाणी, लोणी, मोती, दही. |
| (4) Nouns ending in ऊ, *e.g.*— लाडू, पेरू, काजू, खडू, बांबू, खाऊ, झाडू, उतारू, अश्रू, शत्रू. | बाजू, वाळू, वस्तू. | रडू, हसू, लिंबू, गळू. |
| (5) Large and powerful inanimate objects, *e.g.*— डोंगर, समुद्र, पर्वत, सूर्य, ढग, मेघ. | .. | |
| (6) | .. | Words denoting off-springs, *e.g.*— पोर, वासरू, पिल्लू, कोकरू. |

| | Masculine gender (पुल्लिंगी) | Feminine gender (स्त्रीलिंगी) | Neuter gender (नपुसकलिंगी) |
|---|---|---|---|
| (7) | (*a*) Names of the days of a week, *e. g.*— रविवार, सोमवार, शनिवार. | (*a*) Names of rivers, *e.g.*— गंगा, यमुना, गोदावरी. | Names of metal, *e.g.*— सोने, रूपे, पितळ, लोखंड. [Excption – चांदी (F.) (Silvr.)] |
| | (*b*) Nams of months, *e. g.*— चैत्र, वैशाख, मे, जून. | (*b*) Nams of the Hindu calender days, *e. g.*— प्रतिपदा, द्वितीया, दशमी. | |
| | (*c*) Nams of mountains, *e. g.*— हिमालय, सह्याद्री. | (*c*) Names of Languages *e.g.*— गुजराथी, हिन्दी. | ... |
| | | (*d*) Names of directions, *e. g.*— पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण. | ... |
| | | (*e*) Names of parts of the day, *e. g.*— सकाळ, दुपार, संध्याकाळ. | ... |
| (8) | ... | ... | All nouns ending in ए, *e. g.*— केळे, संत्रे, तळे, मडके, गाणे, बसणे, देणे, घेणे. |
| (9) | ... | ... | Nouns ending in अन and अण, *e.g.*, वाचन (reading), लेखन, गायन, पचन, पालन, भोजन, स्थान, दान, साधन, भवन, वदन (a face), भांडण, स्मरण, अनुकरण (Imitation), अध्ययन (learning), अध्यापन |

| | Masculine gender (पुल्लिंगी) | Feminine gender (स्त्रीलिंगी) | Neuter gendre (नपुसकलिंगी) |
|---|---|---|---|
| | | | (teaching), स्पष्टीकरण (clarification), विश्लेषण (analysis), वर्गीकरण (classification), संवितरण (disbursement), समाधान (satisfaction). [Exceptions – चढण, उतरण, शिवण (all F.)]. |
| (10) | ... | ... Names of cities ending in ई, *e. g.* — मुंबई, दिल्ली, झांशी, अमरावती, परभरणी. | Names of cities, *e. g.* — पुणे, नगर, सोलापूर नागपूर, उस्मानाबाद, नाशिक. |
| (11) | Abstract nouns ending in पणा and वा, *e.g.*, चांगुलपणा, बाईटपणा, गारवा, ओलावा. | Abstract nouns ending in ता, ई, की, गिरी, *e. g.*, धन्यता, कटुता, गरिबी, लुच्चेगिरी, फुशारीकी, मालकी, फसवेगिरी. | Abstract nouns ending in पण, त्व and य, *e.g.*, देवपण, मृदुत्व, दातृत्व, स्वास्थ्य, शौर्य, सत्य. |

These indications may help the learner to fix up the genders of nouns when they are not used in a sentence. The gunders of nouns can be determined by the inflections of adjectives, pronouns, verbs and adverbs which relate to the nouns when the latter are used in a sentence, *e.g.*, (१) हा रूमाल (M.) आहे. In this sentence the demonstrative pronoun हा indicates the gender of रुमाल *viz.*, Masculine. (२) मुलाने हे मोठे पुस्तक चांगले वाचले. In this sentence the gender of पुस्तक, *viz.*, Neuter can be determined by हे the demonstrative pronoun, by मोठे the adjective, by चांगले the adverb and by वाचले the verb.

The chart given above may help the reader to fix up the genders of nouns ending in different vowels. There is, however, a large number of nouns in Marathi, that end in 'अ'; These baffle us while fixing their gender, *e.g.*, परदेश, वास, जाहिरात, तूट, मौज, यंत्र, मिरवणूक (a procession.) The following chart may help the reader at this stage. The hints

offered in the chart do not have the finality of a rule, because every hint may have exceptions.

**Nouns—ending in 'अ'—अकारान्त नामे**

*Masculine Nouns*
(पुल्लिंगी नामे)

(1) Nouns ending in देश, *e.g.*—
स्वदेश, परदेश, आदेश, संदेश, प्रदेश, उपदेश, निदेश, निर्देश.

(2) Nouns ending in चार, *e.g.*—
विचार, आचार, संचार, उपचार, प्रचार, सदाचार, उच्चार, सुविचार, कुविचार, पाहुणचार, दुराचार.

(3) Nouns ending in कार, *e.g.*—
आकार, विकार, प्रकार, अधिकार, अलंकार, होकार, नकार, उपकार, प्रतिकार, अहंकार, अपकार, धिक्कार, चीत्कार, फूत्कार, सत्कार, प्राधिकार, सहकार, चौकार, षट्कार, चमत्कार, नमस्कार.
[Exception—
सरकार (N.)]

*Feminine Nouns*
(स्त्रीलिंगी नामे)

(1) Nouns ending in त, *e.g.*—
जाहिरात, भिंत, इमारत, वसाहत, वरात, हरकत, रीत, तफावत, जात, यातायात, वात, समजूत, मुदत, बचत, मिळकत, दुखापत, किंमत. [Exceptions—दात, हात, भात—all Masculine.]

(2) Nouns ending in थ, *e.g.*—
शपथ, लाथ, साथ, नथ
[Exceptions—रथ, पथ]

(3) Nouns ending in न, *e.g.*—
चैन, मन, तहान, तान.
[Exceptions–कान (M.)
मन (N.)
रान (N.)
वजन (N.)
नुकसान (N.)]

*Neuter Nouns*
(नपुसकलिंगी)

(1) Nouns ending in त्र, *e.g.*—
पत्र, क्षेत्र, सूत्र, यंत्र, तंत्र, चित्र, सत्र, स्तोत्र, गात्र, चरित्र, शास्त्र, शस्त्र.
[Exceptions–मंत्र (M.)
पुत्र (M.)
मित्र (M.)
छात्र (M.)]

(2) Nouns ending in अंतर, *e.g.*—
देशान्तर, वेषान्तर, पाठान्तर, भाषांतर, रूपांतर, धर्मांतर, वस्त्रान्तर.

(3) Nouns ending in आलय, *e.g.*—
कार्यालय, देवालय, भोजनालय, दुग्धालय, रुग्णालय, छात्रालय, मत्स्यालय, विद्यालय, ग्रंथालय, पुस्तकालय, मुख्यालय, मुद्रणालय, चिकित्सालय, सचिवालय

| Masculin Nouns (पुल्लिंगी नामे) | Feminine Nouns (स्त्रीलिंगी नामे) | Neuter Nouns (नपुसकलींगी नामे) |
|---|---|---|
| (4) Nouns ending in हार, *e. g.*—<br>आहार, उपाहार, प्रहार, विहार, संहार, परिहार, अपहार, उद्धार (उत् + हार=U plift). | (4) Nouns ending in ट, *e. g.*—<br>वीट, तीट, खाट, लूट, लाट, भेट, मोट, खोट, तूट, अट, फूट, पहाट.<br>[Exceptions—थाट (M.)<br>कट (M.)<br>पाट (M.)<br>बोट (N.)] | (4) Nouns ending in घर, *e. g.*—<br>आरामघर, मोटारघर, सामानघर, स्वयंपाकघर, माजघर. |
| (5) Nouns ending in योग, *e. g.*—<br>सुयोग, प्रयोग, संयोग, वियोग, उपयोग, विनियोग, योगायोग. | (5) Nouns ending in ड, *e. g.*—<br>आवड, निवड, सवड, परवड, लागवड, गडबड, लुडबुड, (dabbling), खोड, मोड, जोड.<br>[Exceptions–जोड (M.)<br>खोड (N.)] | (5) Nouns ending in य, and त्य, *e. g.*—<br>कार्य, कृत्य, सत्य, नृत्य, साध्य, खाद्य, पेय, वय.<br>[Exceptions—न्याय (M.)<br>पाय (M.)<br>जय (M.)<br>गय (F.)] |
| (6) Nouns ending in वाद, *e. g.*—<br>संवाद, अपवाद, अनुवाद, युक्तिवाद, विवाद, प्रतिवाद. | (6) Nouns ending in ज, *e. g.*—<br>लाज, चीज, मौज, वीज, बाज, समज.<br>[Exceptions–<br>जहाज (N.)<br>अर्ज (M.)<br>समाज (M.)<br>साज (M.)] | (6) Nouns ending in गृह, *e. g.*—<br>स्वयंपाकगृह, स्नानगृह, उपाहारगृह, भोजनगृह, शीतगृह, प्रेक्षागृह, नाट्यगृह, सिनेमागृह. |
| (7) Nouns ending in ताप, *e. g.*—<br>संताप, अनुताप, मनस्ताप, हिवताप, पश्चात्ताप. | (7) Nouns ending in वर्तणूक, *e. g.*—<br>वर्तणूक, वागणूक, अडवणूक, नेमणूक, करमणूक, छळणूक, फसवणूक, निवडणूक (Election). | |

| *Masculine Nouns* (पुल्लिंगी नामे) | *Feminine Nouns* (स्त्रीलिंगी नामे) | *Neuter Nouns* (नपुसकलिंगी नामे) |
| --- | --- | --- |
| (8) Nouns ending in मान, *e. g.*— सन्मान, अभिमान, अवमान, अपमान. | (8) Nouns ending in आवळ, *e. g.*— लिहिणावळ, खाणावळ, दळणावळ, जेवणावळ, शिवणावळ. | ... |
| (9) Nouns ending in पाल, *e. g.*— रोखपाल, ग्रंथपाल, राज्यपाल, द्वारपाल, लेखापाल, भांडारपाल, कोषपाल. | ... | ... |
| (10) Nouns ending in धर्म *e. g.*— राजधर्म, पुत्रधर्म, अधर्म, कुलधर्म. | ... | ... |
| (11) Nouns ending in आरोप, *e. g.*— दोषारोप, मिथ्यारोप, समारोप. | ... | ... |
| (12) Nouns ending in आर, *e. g.*— कुंभार, सुतार, चांभार, लोहार, सोनार, आजार. [Please refer to category (1) in the previous chart] | ... | ... |
| (13) Nouns ending in आव, *e. g.*— प्रस्ताव, अभाव, ठराव, उठाव, पाडाव, मज्जाव, शिरकाव, टिकाव, फैलाव. | ... | ... |

| Masculine Nouns (पुल्लिंगी नामे) | Feminine Nouns (स्त्रीलिंगी नामे) | Neuter Nouns (नपुसकलिंगी नामे) |
|---|---|---|
| (14) Nouns ending in स, *e. g.*— प्रवास, अभ्यास, विलास, विकास, पाऊस, समास, सहवास, अजमास, त्रास, श्वास, रस, दास, मास, वास. | ... | ... |
| (15) Some Nouns ending in ग, *e. g.*— खग, तुरग, विहग, नग, राग, त्याग, मार्ग, डाग, भाग. [Exception—आग (F.)] | ... | ... |
| (16) Nouns ending in अक, *e. g.*— सेवक, गायक, लेखक, प्रेक्षक, चालक, वाहक, संचालक. [These can be included in Category (1) of the previous chart.] | ... | ... |
| (17) Nouns ending in धार, *e. g.*— अंधार, आधार, निर्धार. | ... | ... |

It has to be stated that the nouns in the chart referred to above are primarily अकार ending nouns. It is only for the sake of simplicity and convenience of memorization that they have been shown as ending in चार, कार, णूक, त्र, etc.

Some Sanskrit nouns have been taken over in Marathi, without any change either in their structure or in their gender, e. g., गुण, यत्न, क्रम, द्वेष, (all masculine); भार्या, पत्नी, नदी (all feminine); धन, वन, शरीर, नगर, नाटक, दैव (all neuter).

Besides the nouns referred to above, there are many other nouns (ending in अ) in Marathi for which no rules of classification can be laid down. Some of these are listed below :—

| Masculine (पु.) | Feminine (स्त्री.) | Neuter (न.) |
|---|---|---|
| मुक्काम, हंगाम, घाम, आवाज, अंदाज, करार, दोर, जोर, कागद, विस्तव, नळ, नांगर, पाट, घाट, घोट, रुमाल. | शिकार, चिंच, सवय, ठेव, नाव, जमीन, विहीर, तक्रार, फिर्याद, चूक, तार, कंबर, पाठ, अडचण, मोटार. | पोट, तिकीट, नुकसान, पाकीट, झाड, सरबत, सरकार, शहर, गाव (M. & N.) काळीज, मनगट, नाक, तोंड, कपाट, दार, कुलूप, नशीब. |

Some nouns have more than one gender, e. g.—

१ वेळ (M., F.)-(१) ही येण्याची वेळ (F.) आहे काय?
(२) या कामाला फार वेळ (M.) लागला.

२ तार (M., F.).
३ तंबाखू (M., F.).

The demonstrative pronouns (१) हा, तो, (२) ही, ती, (३) हे, ते are generally used to indicate the genders of nouns, *e.g.*, हा रुमाल, तो रुमाल, (M.); ही विहीर, ती विहीर (F.); हे घर, ते घर (N.).

**अभ्यास १**

Recognise the genders of the following nouns :—

उंदीर, पगडी, मित्र, डोके, पहाट, डोंगर, वृक्ष, विवाह, खेडे, शेजारी, लेखिका, महागाई, योजना, मजला, नाटक, काठी, देव, गाडी, द्वेष, लग्न, बोट, काका, तापी, उत्तर.

Use the appropriate demonstrative pronouns हा, ही, हे in the case of Nos. (1) to (10) and तो, ती, ते in the case of Nos. (11) to (20) with the nouns given below :—

(१) आजार, (२) शिक्षण, (३) नदी, (४) पंखा, (५) बडबड, (६) वासरू, (७) गिऱ्हाईक, (८) विंचू, (९) दाढी, (१०) प्रकृती, (११) पाऊस, (१२) दौत, (१३) लोखंड, (१४) शौर्य, (१५) प्रसंग, (१६) अडचण, (१७) पोपट, (१८) सहल, (१९) व्यवस्था, (२०) पुरावा.

अभ्यास ३

Recognise the genders of the nouns printed in bold type :—

(१) ही **निवडणूक** आहे. (२) हे **वाचनालय** आहे. (३) एवढे **शहाणपण** पुरे आहे. (४) कोणाची **निंदा** करू नका. (५) पुस्तकाचा **अभ्यास** करा. (६) तो **मालक** आहे. (७) **राम सीतेशी** बोलला. (८) **मंत्री झाड** लावतात. (९) **उसापासून साखर** तयार होते. (१०) ही **सायकल** घेऊन जा.

अभ्यास ४

Fill in the gaps by suitable nouns in sentences (1) to (10) and by suitable demonstrative pronouns (तो, ती, ते) in sentences (11) to (20) :–

(१) ही माझी ——— आहे. (२) त्याचे ——— फार मोठे आहे. (३) हा ——— फार चांगला आहे. (४) शहराची ——— वाईट आहे. (५) तो ——— फार विद्वान आहे. (६) माळी म्हणजे फुले विकणारा ———. (७) गायिका म्हणजे उत्तम गाणे म्हणणारी ———. (८) ——— व ——— हे धातू आहेत. (९) विद्यार्थी म्हणजे अभ्यास करणारा ———. (१०) भोजनालय म्हणजे भोजन मिळण्याचे ———. (११) ——— बाग फार चांगली आहे. (१२) ——— कोळीण आहे. (१३) ——— मूल आनंदी आहे. (१४) ——— प्रदेश सुपीक आहे. (१५) ——— फार मोठा त्याग (Sacrifice) आहे. (१६) ——— वागणूक चमत्कारिक आहे. (१७) ——— भिंत मजबूत आहे. (१८) ——— कानडी भाषा आहे. (१९) ——— अनुवाद फार चांगला आहे. (२०) ——— पहिले सत्र आहे.

अभ्यास ५

Translate the following sentences into Marathi :—

(1) (*a*) This is a girl; (*b*) that is a boy; (*c*) that is a machine. (2) That is a headache. (3) That is news. (4) This is a pair of scissors.

(5) That is a difficulty. (6) The word 'Marathi' is a noun in the feminine gender. (7) 'Player' is a noun in the masculine gender. (8) 'Bravery' is a noun in the neuter gender. (9) This is a procession; this is not recreation. (10) 'Cruelty' is an abstract noun.

[*New words* : A headache—डोकेदुखी (F.); News बातमी (F.); a pair of scissors कात्री (F.); Bravery शौर्य (N.); a procession मिरवणूक (F.); a recreation करमणूक (F.); cruelty क्रौर्य (N.); a problem समस्या (F.); a difficulty अडचण (F.).]

● ● ●

# ४ लिंगपरिवर्तन (CHANGE OF GENDER)

लिंगपरिवर्तन means changing the gender of a noun. This change is generally possible in the case of nouns denoting the masculine gender and nouns denoting the feminine gender. Thus, the change in gender from masculine to feminine or *vice versa* is limited to a few nouns only, *e. g.*, आजा (grand-father) M.—आजी (grand-mother) F.; राजा (a king) M.—राणी (a queen) F.

When a noun is used in a sentence, the change in the gender of that noun affects all the words relating to the said noun, *e. g.*, (1) the sentence हा मुलगा घरी जातो will change to ही मुलगी घरी जाते and (2) the sentence हा गाणारा पुरुष आंधळा आहे will change to ही गाणारी स्त्री आंधळी आहे.

The following four rules will help the learner to effect such a change :-

(1) Some masculine nouns ending in अ and all nouns ending in आ change their final अ or आ to ई, when they undergo such a change, *e.g.*, देव-देवी, कुत्रा-कुत्री.

Other examples of this type :—तरुण-तरुणी; आजा-आजी; मुलगा-मुलगी; कुमार-कुमारी; चुलता-चुलती; बकरा-बकरी; दास-दासी; काका-काकी; मेंढा-मेंढी.

(2) Some masculine nouns ending in अ and ई take the suffix ईण when so changed, *e. g.*, उंट-उंटीण; माळी-माळीण.

Other examples of this type :—सुतार-सुतारीण; हत्ती-हत्तीण; कुंभार-कुंभारीण; सोनार-सोनारीण; सिंह-सिंहीण; मालक-मालकीण; शिंपी-शिंपीण; शेजारी-शेजारीण; तेली-तेलीण.

[Exception : गवळी-गवळण]

(3) Some masculine nouns ending in अ change to आ in the course of conversion and their penultimate अ is changed to इ in the process, *e. g.*, लेखक (M.); लेखिका (F.).

Other examples of this type :—गायक-गायिका; शिक्षक-शिक्षिका, नायक-नायिका; अध्यापक-अध्यापिका; बालक-बालिका.

(4) The feminine forms of the following nouns are irregular, *e.g.*, पुरुष-स्त्री; राजा-राणी; विधुर-विधवा.

Other examples of this type :—वडील-आई; भाऊ-बहीण; नवरा-बायको; मित्र-मैत्रीण; पिता-माता; पती-पत्नी; पुत्र-कन्या; बोकड-शेळी; सासरा-सासू; वर-वधू; मोर-लांडोर; विद्वान-विदुषी; दीर-जाऊ; कवी-कवयित्री.

**अभ्यास १**

Change the genders of the nouns in the bold type in the following sentences and re-write them after making consequential changes wherever necessary:—

(१) भारतात अनेक **विद्वान** आहेत. (२) मुंबईत खूप **लेखक** आहेत. (३) त्याचा **आजा** म्हातारा आहे. (४) या गृहस्थांचा **सासरा** काल वारला. (५) मी **भावाला** विचारले, "तू कोठे जातोस?" (६) ती **स्त्री** म्हणाली, "मी घरी जाते". (७) ही **स्त्री विधवा** आहे. (८) **गवळी** रोज सकाळी घरी येतो. (९) **कोळी** मासे पकडतो. (१०) ही **कवयित्री** आहे.

**अभ्यास २**

Give a single Marathi word for every group of words mentioned below :—

(१) कपडे शिवणारा पुरुष, (२) अध्यापन करणारी स्त्री, (३) पदवी परीक्षेपर्यंत शिक्षण देणारे विद्यालय, (४) लेखन करणारी स्त्री, (५) घरातील मुख्य स्त्री, (६) उत्तम नाचणारी स्त्री, (७) भविष्य सांगणारा पुरुष, (८) दूध मिळण्याचे ठिकाण, (९) कादंबरीतील मुख्य स्त्री पात्र, (१०) मुलाची पत्नी, (११) आईची बहीण, (१२) नवऱ्याची बहीण, (१३) नवऱ्याचा भाऊ, (१४) आईची आई, (१५) अध्ययन करणारा मुलगा, (१६) समाजकार्य करणारा पुरुष.

(*Answers* : दीर, दुग्धालय, गृहिणी, नायिका, मावशी, समाजकार्यकर्ता, शिंपी, महाविद्यालय, अध्यापिका, नणंद, आजी, विद्यार्थी, सून, नर्तकी, लेखिका, ज्योतिषी.)

● ● ●

# ५ वचन-विचार (NUMBER)

In Marathi, the plural of nouns is formed in different ways in different genders. We first take up masculine nouns ending in different vowels.

*Masculine Nouns* *Examples*

(1) ending in अ—पाठ, निर्णय, हात, पाय, आदेश, कान, नियम, केस, कप, नारळ, शाप.
(2) ending in आ—महिना, फळा, मसुदा, रस्ता, राजा, मुलगा, आंबा, बटाटा, हत्ता, डोळा.
(3) ending in ई—कवी, भिकारी, पक्षी, प्रवासी, गवळी, हत्ती, धोबी, कोळी, पुढारी, मुनी.
(4) ending in ऊ—चेंडू, भाऊ, खाऊ, लाडू, हेतू, पेरू, गहू, मृत्यू, साडू, काजू.
(5) ending in ओ—धनको (a creditor), ऋणको (a debtor).

*Rule* (नियम).—All masculine nouns, except those ending in आ, do not change in the plural. Nouns ending in आ change their final vowel आ to ए, *e.g.*, आंबा—आंबे; रस्ता—रस्ते; पैसा—पैसे; रुपया—रुपये.

It naturally follows that all other masculine nouns do not undergo any change, *e.g.*, पाठ (sing.)—पाठ (pl.). There is, however, one exception to the above rule. The masculine nouns काका, मामा, दादा, आजोबा, अण्णा are honorific words and are not changed in the plural though they end in आ. The plural of काका remains as काका only. Illustrations of each type mentioned above are given below in the same order :—

| *Singular* | *Plural* |
|---|---|
| हा (this), तो (that). | हे (these), ते (those). |
| (१) हा एक हात आहे. | मला दोन हात आहेत. |
| (२) मी आंबा खातो. | मी आंबे खातो. |

(३) हा माझा काका आहे. — हे माझे काका आहेत.
(४) झाडावर एक पक्षी आहे. — झाडावर खूप पक्षी आहेत.
(५) तो लाडू आहे. — ते लाडू आहेत.
(६) हा धनको आहे. — हे धनको आहेत.

*Note.*— (1) Some masculine nouns are always in the plural number, *e.g.*, हाल, कष्ट.

(2) Some masculine nouns, *e. g.*, भात and abstract nouns ending in पणा and वा, *e. g.*, चांगुलपणा, वाईटपणा, गारवा, ओलावा are always used in the singular number.

**अभ्यास १**

Change the number of the nouns in the bold type in the following sentences and re-write them :—

(१) वर्गात **फळा** आहे. (२) **कुत्रा** पळाला. (३) **भिकारी** भीक मागतो. (४) हा **बटाटा** काप. (५) नेपाळचा **राजा** आला. (६) **कवी** कविता करतो. (७) **हत्ती** जलद धावतो. (८) **शेतकरी** शेतात जातो. (९) कावळा **पक्षी** आहे. (१०) हा माझा **भाऊ** आहे. (११) तो **ढग** आहे. (१२) मुलगा **चेंडू** पकडतो.

**अभ्यास २**

Fill in the blanks in the following sentences with nouns in the masculine gender, singular or plural, as the case may be :—

(१) गाईला चार ----- असतात. (२) ----- काव काव करतात. (३) ----- बिळात राहतो. (४) ----- हा पशु आहे. (५) पिकलेले ----- गोड असतात. (६) ----- दूध घालतो. (७) कालिदास हा ----- होता. (८) वर्षात बावन्न ----- असतात. (९) लिपिक ----- प्रस्तुत करतात. (१०) प्रत्येकाला दोन ----- असतात.

**अभ्यास ३**

Translate the following sentences into Marathi :—

(1) Leaders work hard, (2) She buys ornaments, (3) My maternal uncle eats mangoes, (4) our guests drink tea, (5) I bring three balls, (6) He is my uncle, (7) Weavers weave cloth, (8) You read lessons, (9) Those are Government Resolutions, (10) There are twelve months in a year.

[*New words* : A leader—पुढारी (M.); to buy—खरेदी करणे; an ornament—दागिना (M.); meternal uncle—मामा (M.); a guest—पाहुणा (M.); a weaver—विणकर (M.); a Government Resolution—शासन-निर्णय (M.); in a year—वर्षात.]

(1) (*a*) ending in अ—अट, आग, तक्रार, सोय, जाहिरात, सहल, आठवण, मोटार, समजूत, भिंत, विहीर, बहीण.

(*b*) ending in अ—तारीख, खारीक, बेरीज.

(*c*) ending in अ—गरज, जखम, शपथ, काच, वाट, चिंच, चूक, वीज, भूक, बंदूक, सून, करमणूक.

*Feminine Nouns* *Examples*

(2) ending in आ—शाळा, शाखा, विद्या, शिक्षा, भाषा, कविता, सूचना, महिला, धारणा (Presumption), जनगणना (Census].

(3) (*a*) ending in ई—नदी, पेटी, राणी, काकडी, खुर्ची, बाई, बादली, भाजी, सुई, आकृती, आवृत्ती, युवती.

(*b*) ending in ई— दासी, कृती, नीती, भीती, शक्ती, भक्ती, नारी, सती, साध्वी.

(४) ending in ऊ—वस्तू, बाजू, धेनू, वधू, वाळू.

(5) ending in ओ—बायको.

Different categories of feminine nouns have different rules for changing them from singular to the plural. We now take up the rules in the same serial order of the feminine nouns, mentioned above.

*Rule 1* (*a*).—Feminine nouns under this group change their final अ to ई in the plural, e. g., अटी, आगी, तक्रारी. सोयी, जाहिराती, सहली, भिंती.

Some nouns such as विहीर, समजूत (understanding), बहीण, जमीन shorten their penultimate long vowels, e.g., विहीर-विहिरी, समजूत-समजुती, बहीण-बहिणी जमीन-जमिनी. There are some exceptions; म्हैस (sing). changes to म्हशी (pl.), मोलकरीण (sing.) changes to मोलकरणी (pl.); कोळीण (sing.) changes to कोळणी (pl.).

*Use in sentences*—

| *Singular* | *Plural* |
|---|---|
| (१) मी तक्रार करतो. | (१) मी तक्रारी करतो. |
| (२) तो जाहिरात वाचतो. | (२) तो जाहिराती वाचतो. |
| (३) येथे एक विहीर आहे. | (३) येथे तीन विहिरी आहेत. |

*Rule 1 (b).*—Feminine nouns in this class change their final
in the plural and in the process the penultimate ई is changed to अ, *e. g.*, तारीख (sing.)—तारखा (pl.), बेरीज (sing.) –बेरजा (pl.), खारीक (sing.) —खारका (pl.).

There are very few nouns in this class.

*Use in sentences.*—

| *Singular* | *Plural* |
| --- | --- |
| (१) पत्रावर तारीख घाला. | (१) पत्रांवर तारखा घाला. |
| (२) बेरीज करा. | (२) बेरजा करा. |
| (३) खारीक खा. | (३) खारका खा. |

*Rule 1 (c).* — Feminine nouns in this class change their final अ to आ and in the process the Penultimate ई or ऊ (if any) becomes short, *e .g.*, गरज-गरजा, शपथ-शपथा, काच-काचा, वाट-वाटा, चिंच-चिंचा, but चूक-चुका, वीज-विजा, भूक-भुका, सून-सुना.

*Use in sentences*—

| *Singular* | *Plural* |
| --- | --- |
| (१) मी शपथ घेतो. | (१) मी शपथा घेतो. |
| (२) मुलगा चिंच खातो. | (२) मुलगा चिंचा खातो. |
| (३) येथे बंदुक आहे. | (३) येथे बंदुका आहेत. |
| (४) सून घरी येते. (The daughter-in-law comes home) | (४) सुना घरी येतात. (Daughters in-law come home). |

*Rule 2.*—Feminine nouns ending in आ, *e. g.*, भाषा (a language) do not change their form in the plural, *e. g.* भाषा (sing.) — भाषा (pl.), कविता (sing.)—कविता (pl.)

*Use in sentences*—

| *Singular* | *Plural* |
| --- | --- |
| (१) मुंबईत एक शाळा आहे. | (१) मुंबईत अनेक शाळा आहेत. |
| (२) विद्यार्थी कविता वाचतो. | (२) विद्यार्थी दोन कविता वाचतात. |
| (३) ही सूचना आहे. | (३) ह्या (या) सूचना आहेत. |

*Rule 3 (a)*.— Feminine nouns in this class change their final ई to या, *e.g.*, नदी (sing.) — नद्या (pl.), पेटी (sing.) — पेट्या (pl.), पोपई (sing.) — पोपया (pl.), exceptions : स्त्री (sing.) — स्त्रिया (pl.), बी (sing.) — बिया (pl.).

*Use in sentences —*

| *Singular* | *Plural* |
|---|---|
| (१) गोदावरी ही नदी आहे. | (१) कृष्णा व गोदावरी ह्या (या) नद्या आहेत. |
| (२) तू पोपई खातोस. | (२) तू पोपया खातोस. |
| (३) ती काकडी खाते. | (३) ती काकड्या खाते. |
| (४) येथे एक स्त्री आहे. | (४) येथे स्त्रिया आहेत. |

*Rule 3 (b)*. — Feminine nouns under this category do not undergo any change in the plural, e.g., दासी (sing.) remains दासी in the plural; इष्टी (sing.) — इष्टी (pl.).

*Use in sentences—*

| *Singular* | *Plural* |
|---|---|
| (१) दासी काम करते. | (१) दासी काम करतात. |
| (२) ही कृति उत्तम आहे. | (२) या कृति उत्तम आहेत. |

*Rule 4*.— Feminine nouns under this group do not undergo any change in the plural, *e.g.*, वस्तू (sing.) — वस्तू (pl.).

*Use in sentences—*

| | |
|---|---|
| (१) मी एक वस्तू आणतो. | (१) मी अनेक वस्तू आणतो. |
| (२) ही एक बाजू आहे. | (२) ह्या चार बाजू आहेत. |

Please note the following feminine nouns coming under this category — (1) वाळू (sand) is always used in the singular, (2) The word ऊ (a louse) changes to उवा (lice) in the plural; the nouns सासू (mother-in-law) and जाऊ (sister-in-law) change their final ऊ to वा, सासू (sing.) — सास्वा (pl.), जाऊ (sing.) — जावा (pl.).

*Rule 5.*—There is only one noun in this class, *viz.* बायको. It changes to बायका in the plural.

**अभ्यास १**

Change the numbers of nouns in bold type in the following sentences and re-write them :–

(१) मुलगी सूई आणते.
(२) बाजारात मिरची नाही.
(३) तो युक्ती लढवतो.
(४) बाजारातून दोन वस्तू आणा.
(५) मुलांना भूक लागते.
(६) आकाशात वीज चमकते.
(७) तिला दोन जावा आहेत.
(८) ते जाहिराती वाचतात.
(९) भिंत मजबूत आहे.
(१०) येथे काचा आहेत.

**अभ्यास २**

Fill in the gaps in the following sentences by using nouns in the feminine gender (singular or plural), as the case may be :–

(१) गुजराती व बंगाली या —— आहेत.
(२) ——— गवत खातात.
(३) ——— दुकानात जातात.
(४) मला तीन ——— आहेत.
(५) ही काळ्या शाईची —— आहे.
(६) ——— घ्या आणि गोळ्या मारा.
(७) गावकरी ——— खणतात.
(८) मुली ——— खातात.
(९) हल्ली ——— नोकरी करतात.
(१०) पाच अधिक तीन ही ——— आहे.

**अभ्यास ३**

Translate the following sentences into Marathi :–

(1) My mother-in-law is not at home, (2) The villagers dig three wells during the year, (3) A servant buys needles, (4) There are lightnings in the sky, (5) People read an advertisement, (6) These are the requirements (needs), (7) He changes the dates, (8) Chillies are generally hot, (9) He learns new methods, (10) I take up the suggestion.

[*New words* : At home—घरी, घरात; during the year—वर्षात; a lightning—वीज (F.); a need गरज (F.); generally—बहुधा; new—नवीन; to take up—स्वीकारणे.]

| Neuter Nouns | Examples |
|---|---|
| (1) (a) ending in अ — | घर, पत्र, मन, पान, चित्र, झाड, काम, दार, फळ, वाक्य, वेतन, पुस्तक, कपाट, नाटक, मासिक, मंडळ, मैदान, भांडार, सरकार, देवालय, कार्यालय, सचिवालय. |
| (b) ending in अ — | फूल, मूल, कूळ, बीळ, दूध. |
| (2) ending in ई — | लोणी, पाणी, दही, मोती. |
| (3) ending in ऊ — | पाखरू, लिंबू, वासरू. |
| (4) ending in ए — | गाणे, तळे, मडके, केळे, भांडे, डोके, घरटे, देणे, घेणे, खेडे. (सोने, रुपे; तांबे, शिसे are not used in the plural.) |

*Rule 1 (a).*—All neuter nouns coming under this category change their final अ to ए, *e. g.*, घर (sing.)—घरे (pl.), फळ (sing),—फळें (pl.), but देऊळ (sing.),—देवळे (pl.).

*Use in sentences*—

| *Singular* | *Plural* |
|---|---|
| (१) भाऊ नाटक पाहतो. | (१) भाऊ नाटके पाहतो. |
| (२) हे कपाट आहे. | (२) ही कपाटे आहेत. |
| (३) आम्ही मासिक वाचतो. | (३) आम्ही मासिके वाचतो. |

*Rule 1 (b).*—All neuter nouns coming under this category change their final अ to ए and their penultimate long vowels become short in the process, *e. g.*, फूल (sing.) —फुले (pl.); बीळ (a hole-sing.)—बिळे (pl.).

*Use in sentences*—

| *Singular* | *Plural* |
|---|---|
| (१) मूल दूध पिते. | (१) मुले दूध पितात. |
| (२) मुलीला फूल आवडते. | (२) मुलीला फुले आवडतात. |

*Rule 2.*—In this category the nouns लोणी, पाणी, दही, are not used in the plural : the only noun मोती changes to मोत्ये optionally, *e. g.*, मोती (sing.)—मोती or मोत्ये (pl).

| Singular | Plural |
|---|---|
| (१) उन्हाळ्यात आपण फार पाणी पितो. | ... |
| (२) हल्ली लोणी फार महाग आहे. | ... |

*Rule 3.*—Neuter nouns ending in ऊ change their final ऊ to ए in the plural, *e. g.*, लिंबू, (a lemon)—लिंबे (lemons).

*Use in sentences*—

| Singular | Plural |
|---|---|
| (१) पाखरू आकाशात उडते. | (१) पाखरे आकाशात उडतात. |
| (२) लिंबू महाग आहे. | (२) लिंबे महाग आहेत. |

*Rule 4.*—Neuter nouns ending in ए change their final ए to ई in the plural, *e. g.*, गाणे (sing.)—गाणी (pl.); खेडे (sing.)—खेडी (pl.)

Names of metals such as सोने (gold), तांबे (copper), शिसे (lead) are never used in the plural.

*Use in sentences*—

| Singular | Plural |
|---|---|
| (१) हे एक घरटे आहे. | (१) ही अनेक घरटी आहेत. |
| (२) मला गाणे आवडते. | (२) मला गाणी आवडतात. |
| (३) सोने फार महाग आहे. | (३) Same as in singular. |

अभ्यास १

Change the number of nouns in bold type in the following sentences and re-write them with the necessary changes :—

(१) हे **घर** आहे, (२) ती **पत्र** लिहिते, (३) लोक रोज **वर्तमानपत्र** वाचतात, (४) हे **फूल** सुंदर आहे, (५) मुलगी **गाणे** म्हणते, (६) **केळी** गोड आहेत, (७) मुलगा **भांडण** करतो, (८) **पुस्तक** वाचा, (९) **मुले** दंगा करतात, (१०) झाडावर **घरटी** आहेत.

**अभ्यास २**

Fill in the blanks in the following sentences by using neuter nouns, singular or plural, as the case may be :—

(१) झाडांची .... हिरवी असतात, (२) ...... म्हणजे भोजन मिळण्याचे ठिकाण, (३) पुणे हे ऐतिहासिक ...... आहे, (४) ...... म्हणजे कामकाज करण्याचे ठिकाण, (५) शासन या अर्थी '......' वापरतात, (६) गवई ..... म्हणतो, (७) 'मुलगा अभ्यास करतो' हे ...... आहे.

**अभ्यास ३**

Translate the following sentences into Marathi :—

(1) Coolies bring cupboards, (2) There are many villages in India, (3) Boys read newspapers and magazines, (4) Lemons are good for health, (5) Girls like flowers, (6) An artist draws pictures, (7) Students solve examples, (8) These are villages, (9) 'A bird flies in the sky' is a sentence, (10) We eat plantains, apples and oranges.

[*New words* : A coolie--हमाल (M.); in India--भारतात; for health--आरोग्याकरिता; good--हितकारक, चांगली; an artist--कलाकार (M.); to solve—सोडविणे; an example—उदाहरण (N.); an apple—सफरचंद (N.) an orange—संत्रे (N.).]

## SUMMARY

### *Numbers*

### वचने

| | *Examples* | |
|---|---|---|
| | Singular (एकवचन) | Plural (अनेकवचन) |
| *Nouns (Masculine genders)*— | | |
| (1) Nouns ending in अ do not change. | पाठ, नोकर, शिक्षक, लिपिक | No change. |
| (2) Nouns ending in आ change to ए. | रस्ता, आंबा, घोडा, पैसा | रस्ते, आंबे, घोडे, पैसे. |
| (3) Nouns ending in ई do not change. | कोळी, धोबी, वाणी, हत्ती कवी. | No change. |

अभ्यास १

Fill in the gaps with the past tense forms of verbs shown at the end of each of the following sentences :—

(१) मी सकाळी सहा वाजता (उठणे). (२) काल आम्ही घरी (बसणे). (३) तू पावसात (भिजणे). (४) तुम्ही मुंबईत खूप (फिरणे). (५) तो लिपिकावर फार (रागावणे). (६) ते फार (भांडणे). (७) ती मुलगी झाडावर (चढणे). (८) स्त्रिया महिला मंडळात (जाणे). (९) माझ्या पायाला उंदीर (चावणे). (१०) आम्ही खूप (खेळणे) व (दमणे). (११) रमेश माझ्या घरी (येणे). (१२) पत्नी मला (म्हणणे). (१३) मी घरात (जाणे). (१४) जेवण तयार (होणे) काय? (१५) आमच्यावर खूप संकटे (येणे).

अभ्यास २

Give the corresponding past tense forms of the following present tense forms :—

आहेत, भांडतोस, पळतो, पडतात, घाबरतात, भटकते, मरतेस, पिते, थुंकता, फिरतो.

अभ्यास ३

Translate the following sentences into Marathi :—

(1) We went home at 5 o'clock yesterday. (2) The son quarrelled with his father. (3) The officer came to the office and was angry with the peon. (4) He drank tea in the morning. (5) She walked in the rain. (6) My daughter said, "A rat bit my foot". (7) My friends played cards in my house. (8) People ran to the nearest building. (9) Children started from the school and reached their home in time. (10) We were afraid of darkness. (11) Five men, three women and two children died in the fire. (12) My friend came to me in the morning. (13) People were angry with the authorities. (14) The whole nation was surprised. (15) It rained heavily yesterday morning.

[*New words* : in the rain — पावसात; cards—पत्ते; was surprised — आश्चर्यचकित झाले; with the authorities — अधिकाऱ्यांवर; it rained — पाऊस पडला].

# ११ भूतकाळ-भाग २---सकर्मक क्रियापदे
## ( PAST TENSE- PART II--TRANSITIVE VERBS )

In this Part the forms of transitive verbs in the past tense will be dealt with. Now read the following sets of sentences :—

| *Present Tense* | *Past Tense* |
|---|---|
| १. लिपिक मसुदा ( M. ) लिहितो. | १. लिपिकाने मसुदा ( M. ) लिहिला. |
| २. लिपिक मसुदे ( M. ) लिहितो. | २. लिपिकाने मसुदे ( M. ) लिहिले. |
| ३. लिपिक मसुदा ( M. ) लिहितात. | ३. लिपिकांनी मसुदा ( M. ) लिहिला. |
| ४. लिपिक मसुदे ( M. ) लिहितात. | ४. लिपिकांनी मसुदे ( M. ) लिहिले. |

In these sentences the object मसुदा is in the masculine gender; in the past tense the verbs लिहिला, etc., agree with the number, gender and the case of the object, *viz.*, मसुदा, *e.g.*, मसुदे लिहिले, मसुदा लिहिला. The subject लिपिक is changed to the instrumental case लिपिकाने or लिपिकांनी according to number in the original sentence.

Now read the following sentences :—

| | |
|---|---|
| १. मुलगी भाजी ( F. ) आणते. | १. मुलीने भाजी ( F. ) आणली. |
| २. मुलगी भाज्या ( F. ) आणते. | २. मुलीने भाज्या ( F. ) आणल्या. |
| ३. मुली भाजी ( F. ) आणतात. | ३. मुलींनी भाजी ( F. ) आणली. |
| ४. मुली भाज्या ( F. ) आणतात. | ४. मुलींनी भाज्या ( F. ) आणल्या. |

In these sentences the object भाजी is in the feminine gender. The verbs आणली, आणल्या in the past tense, etc., agree with the objects भाजी and भाज्या respectively. The subjects मुलगी, मुली are changed to their respective instrumentals, *viz.*, मुलीने, मुलींनी.

Now read the following sentences :—

| | |
|---|---|
| १. नोकर पत्र ( N. ) टाकतो. | १. नोकराने पत्र ( N. ) टाकले. |
| २. नोकर पत्रे ( N. ) टाकतो. | २. नोकराने पत्रे ( N. ) टाकली. |
| ३. नोकर पत्र ( N. ) टाकतात. | ३. नोकरांनी पत्र ( N. ) टाकले. |
| ४. नोकर पत्रे ( N. ) टाकतात. | ४. नोकरांनी पत्रे ( N. ) टाकली. |

In these sentences, the object पत्र is in the neuter gender. The verbs टाकले and टाकली in the past tense agree with the object पत्र and पत्रे respectively. The subjects नोकर (Sing.) and नोकर (Pl.) are changed to their instrumental forms नोकराने and to नोकरांनी respectively.

We give below some additional transitive verbs :—

(१) मुक्त करणे (to discharge, to relieve).
(२) कृपा करणे (to favour).
(३) तक्रार करणे (to complain).
(४) त्रास देणे (to trouble).
(५) तयार करणे (to prepare).
(६) दूर करणे (to redress).
(७) निलंबित ठेवणे (to suspend).
(८) आग्रह धरणे (to insist on).
(९) प्रतिज्ञा करणे (to pledge).
(१०) निश्चय करणे (to resolve).
(११) मेळ घालणे (to reconcile).
(१२) नजरेस आणणे (to bring to notice).

We can, with the help of these data, arrive at some generalizations. In the case of a transitive verb used in the past tense : (1) the verb agrees with the object in gender and in number; (2) the subject is changed to its instrumental case, (case endings ने and नी) singular number or plural number, as the case may be.

This generalization holds good when the object is un-inflected (अप्रत्ययी कर्म). But if the object is used in its inflected form, *i.e.*, when it is used with a case-ending (सप्रत्ययी कर्म) the verb in the past tense is used *in the third person singular* and *in the neuter gender,* irrespective of the number (singular or plural) of the subject and of the object, *e.g.* :—

| *Present* | *Past* |
|---|---|
| १. दुर्जन सज्जनाला फसवतो. | १. दुर्जनाने सज्जनाला फसवले. |
| २. दुर्जन सज्जनांना फसवतो. | २. दुर्जनाने सज्जनांना फसवले. |
| ३. दुर्जन सज्जनाला फसवतात. | ३. दुर्जनांनी सज्जनाला फसवले. |
| ४. दुर्जन सज्जनांना फसवतात. | ४. दुर्जनांनी सज्जनांना फसवले. |

Some additional sentences of this kind are given below :—

| *Present* | *Past* |
|---|---|
| १. वडील मुलाला बोलावतात. | १. वडिलांनी मुलाला बोलावले. |
| २. शिपाई चोराला पकडतो. | २. शिपायाने चोराला पकडले. |
| ३. शिपाई चोराला पकडतात. | ३. शिपायांनी चोराला पकडले. |
| ४. शिपाई चोरांना पकडतात. | ४. शिपायांनी चोरांना पकडले. |

## Additional Sentences

| Present | | Past | |
|---|---|---|---|
| १. | मुलगा दात घासतो—मूल दात घासते. | १. | मुलाने दात घासले. |
| २. | मुले दात घासतात. | २. | मुलांनी दात घासले. |
| ३. | भिकारी पेटी वाजवतो. | ३. | भिकाऱ्याने पेटी वाजवली. |
| ४. | भिकारी पेटी वाजवतात. | ४. | भिकाऱ्यांनी पेटी वाजवली. |
| ५. | लिपिक टिप्पणी लिहितात. | ५. | लिपिकांनी टिप्पणी लिहिली. |
| ६. | लिपिक टिप्पणी लिहितो. | ६. | लिपिकाने टिप्पणी लिहिली. |
| ७. | आम्ही चित्रपट पाहतो. | ७. | आम्ही चित्रपट पाहिले. |
| ८. | तुम्ही कपडे धुता. | ८. | तुम्ही कपडे धुतले. |
| ९. | तो काम करतो. | ९. | त्याने काम केले. |
| १०. | ती निरोप सांगते. | १०. | तिने निरोप सांगितला. |

**अभ्यास १**

Construct sentences (as many as you can) with the help of the words given in brackets, using the verb in the past tense :—

(१) (भिकारी) (भीक) (माग). (२) (सचिव) (काम) (सांग). (३) (तो) (स्थळ) (पाह). (४) (वडील) (कपडे) (बदल). (५) (ती) (रजा) (घे). (६) (अधिकारी) (चर्चा) (कर). (७) (ते) (बातमी) (ऐक). (८) (लोक) (टाळी) (वाजव). (९) (अधीक्षक) (हाक) (मार). (१०) (सचिव) मसुदा) (तपास).

**अभ्यास २**

Fill in the gaps in the following sentences by means of suitable nouns given at the end :—

(१) गाढवाने—मारली. (२) गाढवांनी—मारल्या. (३) निदेशकांनी—दाखवली. (४) निदेशकांनी—दाखवल्या. (५) मी—विकत घेतला. (६) मी—विकत घेतले. (७) तिने — विकली. (८) तिने — विकल्या. (९) सचिवांनी — विचारला. (१०) सचिवांनी—विचारले. (११) तू—केलास. (१२) तू—केलेस. (१३) तुम्ही—काढले. (१४) तुम्ही—काढलीत. (१५) नाटककारांनी —लिहिले. (१६) नाटककारांनी—लिहिली.

(Answers : नाटके, प्रश्न, गृहपाठ, भाज्या, लाथा, वही, घोडे, नाटक, भाजी, लाथ, घोडा, चित्र, वह्या, चित्रे.)

## अभ्यास ३

Complete the following sentences by using suitable subjects and objects :—

(१) ········ बांधले. (२) ········ प्याला. (३) ········ पकडले. (४) ········ दिले. (५) ········ आणलेस. (६) ········ घेतलीत. (७) ········ शिवले. (८) ········ केली. (९) ········ बोलावले. (१०) ········ मारले.

## अभ्यास ४

Translate the following sentences into Marathi :—

(1) The cat killed a mouse; cats killed mice. (2) He wrote a letter and posted it. (3) She brought books and vegetables. (4) The teacher asked a few questions. (5) First, I ate the apple and then drank the milk. (6) He shut the door and opened the window. (7) The Chief Minister made a statement in the Assembly. (8) The merchant sold sugar in the blackmarket. (9) We did our work and the superintendent examined it. (10) The students saw the Ajintha Caves. (11) I gave my wife fifty rupees and she bought a new saree. (12) The novelist wrote two novels and published them.

[*New words* : a mouse — उंदीर (M.); to post — पोस्टाच्या पेटीत टाकणे; an apple — सफरचंद (N.); a statement — निवेदन (N.); in the black-market — काळ्याबाजारात; Students — विद्यार्थी; to publish — प्रसिद्ध करणे.]

## अभ्यास ५

Rewrite the following passages using the verbs in the past tense :—

खालील उताऱ्यातील क्रियापदांची भूतकाळी रूपे वापरून उतारे पुन्हा लिहा :—

(१) रमेश माझा मित्र आहे. तो माझ्या घरी येतो. मी दार उघडतो व त्याला काही प्रश्न विचारतो. तो कार्यालयातून घरी येतो, कपडे बदलतो, हातपाय धुतो, फराळ करतो, चहा पितो व वर्तमानपत्र वाचतो. त्याची पत्नी कापडाच्या दुकानात जाते व सुंदर पातळ पाहते.

(२) कुंभार मडकी करतो. सुतार खुर्ची बनवतो. धोबी कपडे धुतो. कोळी मासे पकडतो. चिकित्सक औषध देतो. गाय दूध देते. वाणी साखर विकतो.

(३) एक कोल्हा आहे, त्याला भूक लागते. तो अरण्यात जातो. खूप फिरतो. बऱ्याच वेळाने तो एक द्राक्षाचा वेल पाहतो. एक उडी मारतो. पुष्कळ उड्या मारतो. निराश होतो. परत जातो.

(४) एक गृहस्थ आहे. तो मुंबईला येतो. मित्राकडे उतरतो. दोघे प्रेक्षणीय स्थळे पाहावयास निघतात. मंत्रालयापाशी येतात. मंत्रालयाची भव्य इमारत पाहतात.

● ● ●

# १२ भविष्यकाळ (FUTURE TENSE)

The future tense is used to express the sense of futurity. It is used of an act that has still to take place, *e.g.*, **उद्या पाऊस पडेल** (It will rain tomorrow); मी उद्या आपल्याला भेटेन (I shall see you tomorrow); लोक प्रार्थना करतील (People will pray).

Now read the following paragraph :—

गुरुजी म्हणाले, "जरा वेळाने आकाशात ढग **जमतील**, काळोख **होईल**, जोराचा पाऊस **पडेल**. आपण सर्व वर्गातच **बसू**. तुम्ही बाहेर कसे **जाल**? मी तुम्हाला गोष्टी **सांगेन**; नंतर तुम्ही प्रत्येकजण एकेक गोष्ट **सांगाल** काय?" राम म्हणाला, "गुरुजी, मी एक गोष्ट **सांगेन**. माझे मित्र पण एक एक गोष्ट **सांगतील**". "ठीक आहे", गुरुजी म्हणाले, "पाऊस थांबेपर्यंत आपण वर्गातच **बसू**; तोपर्यंत गोष्टी **सांगू**".

The verbs in the bold type in the above passage are in the future tense, *e.g.*, बसू (from बसणे); होईल (from होणे); पडेल (from पडणे); जाल (from जाणे) etc.

Before the regular forms of verbs are given, it should be noted that there are two types of conjugated forms in the future tense.

(1) For intransitive verbs not included in category (3) below, *e.g.*, बसणे, धावणे, निजणे, नाचणे, उठणे, पडणे, रडणे, हसणे, भांडणे, रागावणे etc.

(2) For Transitive verbs not included in category (3) below, *e.g.*, फेकणे, करणे, आणणे, पाठवणे, लिहिणे, विकणे, दाखवणे, पाहणे, टाळणे (to avoid), फसवणे, लपवणे (to hide), etc.

(3) As for the verbs ending in आ, ई, ऊ, ए and ओ (both transitive and intransitive) *i.e.*, ending in vowels, they yield forms similar to those in category (2) above Verbs of this type are given below :—

जा (जाणे) (Int.)
खा (खाणे) (Tr.) } ending in आ
गा (गाणे) (Tr.)

पि (पिणे) (Tr.)
भि (भिणे) (Tr.) } ending in इ

धु (धुणे) (Tr.) ending in उ

ये (येणे) (Int.)
दे (देणे) (Tr.) } ending in ए
घे (घेणे) (Tr.)

हो (होणे) (Int.) ending in ओ

verbs.

### Future Tense (भविष्यकाळ) बसणे

| | *Singular* | *Plural* |
|---|---|---|
| First person | मी बसेन (M. F.)<br>(I shall sit) | आम्ही/आपण बसू (M. F.)<br>(We shall sit) |
| Second person | तू बसशील (M. F.)<br>(You will sit) | तुम्ही/आपण बसाल (M. F.)<br>(You will sit) |
| Third person | तो बसेल (M. F.)<br>(He will sit)<br>ती बसेल (F.)<br>(She will sit)<br>ते बसेल (N.)<br>(It will sit) | ते बसतील (M.)<br>(They will sit)<br>त्या बसतील (F.)<br>(They will sit)<br>ती बसतील (N.)<br>(They will sit) |

Verbs mentioned in this category will yield similar forms *e.g.*, मी धावेन (I shall run); तो धावेल (He will run); मी भांडेन (I shall quarrel); तो भांडेल (He will quarrel).

Now we take up category (2) : Transitive verbs (सकर्मक क्रियापदे)

### Future Tense (भविष्यकाळ) वाचणे

| | *Singular* | *Plural* |
|---|---|---|
| First person<br>(प्रथम पुरुष) | मी वाचीन (M. F.)<br>(I shall read) | आम्ही/आपण वाचू (M. F.)<br>(We shall read). |
| Second person<br>(द्वितीय पुरुष) | तू वाचशील (M. F.)<br>(You will read) | तुम्ही/आपण वाचाल (M. F.)<br>(You will read) |
| Third person<br>(तृतीय पुरुष) | तो वाचील (M.)<br>(He will read)<br>ती वाचील (F.)<br>(She will read)<br>ते वाचील (N.)<br>(It will read) | ते वाचतील (M.)<br>(They will read)<br>त्या वाचतील (F.)<br>(They will read)<br>ती वाचतील (N.)<br>(They will read) |

Verbs mentioned in this category will yield forms on the lines mentioned above, *e.g*, मी आणीन (I shall bring); तो आणील (He will bring); मी करीन (I shall do); तो करील (He will do).

Verbs mentioned in the third category *i.e.*, जाणे, खाणे etc., yield forms like those in the second category *e.g.*, मी जाईन, आम्ही जाऊ. There is, however, one change in the second person plural in respect of verbs ending in इ, उ, ए and ओ; such forms are given below :-

| | | | |
|---|---|---|---|
| पी - प्याल | (You will drink) | दे - द्याल | (You will give) |
| भि - भ्याल | (You will be afraid) | घे - घ्याल | (You will take) |
| धु - धुवाल | (You will wash) | हो - व्हाल | (You will become) |
| ये - याल | (You will come) | गा - गाल | (You will sing) |

We give below the forms of पी (पिणे) and धु (धुणे) in the future tense.

धुणे (to wash)

| | *Singular* | *Plural* |
|---|---|---|
| First person | मी धुईन<br>(I shall wash) | आम्ही / आपण धुऊ<br>(We shall wash) |
| Second person | तू धुशील<br>(You will wash) | तुम्ही / आपण धुवाल<br>(You will wash). |
| Third person | तो / ती / ते धुवील<br>(He / She / It will wash)<br>(M. F. N.) | ते / त्या / ती धुतील<br>(They will wash).<br>(M. F. N.) |

**पिणे** (to drink)

| | | |
|---|---|---|
| First person | मी पिईन (M. F.)<br>(I shall drink) | आम्ही / आपण पिऊ (M. F.)<br>(We shall drink) |
| Second person | तू पिशील (M. F.)<br>(You will drink) | तुम्ही / आपण प्याल (M. F.)<br>(You will drink) |
| Third person | तो / ती / ते / पिईल<br>(He / She / It will drink)<br>(M. F. N.) | ते / त्या / ती पितील<br>(They will drink)<br>(M. F. N.) |

The verbs सांगणे (to tell) and the verb मागणे (to ask for) -- both transitive -- yield both the forms in the first person and in the third person sing., *e.g.*, सांगेन-सांगीन, सांगेल-सांगील, मागेन-मागीन, मागेल-मागील The verbs थुंकणे (to spit), जेवणे (to dine), नेसणे (to wear), चुकणे (to miss), समजणे (to understand), स्मरणे (to remember), शिकणे (to learn), विसरणे (to forget) yield forms like the intransitive verb बसणे.

(1) We use the future tense wherever we employ the words 'should' and 'would' in English *e.g.*, (१) त्याला कोण हसेल? (Who would laugh at him?). (२) तू जाशील अशी आमची खात्री होती (We were certain that you would go); तू जाणार अशी आमची खात्री होती (We were certain that you will go).

(2) It is used in the first clause of the conditional sentence *e.g.*, आंधळ्याला मदत कराल किंवा पैसे द्याल तर फार बरे होईल (It would be better if you would help the blind).

(3) We sometimes use the future tense where we use the present tense in English *e.g.*, तुला आवडेल/ वाटेल तसे कर (Do as you like or as you please).

(4) The future tense is used to express the possibility as is expressed by the auxiliary verb 'may' *e.g.*, मला कोणीतरी भेटेल/दिसेल (Someone may meet me).

**अभ्यास १**

Fill in the gaps in the following sentences by using the future tense of the verbs given in brackets :—

(१) तुम्ही इकडे लक्ष (दे) काय? (२) परवा परीक्षा (संप). (३) तो उद्या नागपूरला (जा) व भावाकडे (उतर). (४) उद्या या वेळेस आम्ही घरीच (अस). (५) भिकाऱ्याला पाहून मी सुखी कसा (हो)? (६) गरिबाला औषध (दे) तर बरे (हो). (७) तुम्ही परवानगी (दे) तर मी (ये). (८) जर तो (ये) तर सामान घेऊन (जा). (९) अन्न नसले तर लोक काय (कर)? (१०) व्यापारी नुकसान का (सोस)? (११) तुम्ही (सांग) तसे ते (वाग). (१२) मी गेलो तर (जा). (१३) तुम्ही (बस) तर मी (बस).

**अभ्यास २**

Change the verbs in the following sentences in the future tense and effect consequential changes :–

(१) म्हैस लाथ मारते. (२) शिंप्याने कपडे शिवले. (३) तुम्ही काय खाता? (४) ही गोष्ट तुम्हाला माहीत होईल. (५) मी आंबा खाल्ला. (६) रात्र झाली; आता

आपण झोपतो. (७) आम्ही पत्र लिहिले. (८) पक्षी आकाशात उडाले. (९) कोळ्यांनी मासे पकडले. (१०) तिने प्रश्न विचारले. (११) आम्ही रात्री अभ्यास करतो. (१२) आम्ही संध्याकाळी सहा वाजता घरी येतो, हातपाय धुतो, कपडे बदलतो, चहा पितो व वर्तमानपत्र वाचतो. (१३) ते सकाळी उठले व खोलीतच बसले. (१४) तू म्हणतोस तसे मी करतो. (१५) हुशार मुले परीक्षेत उत्तीर्ण होतात व शिष्यवृत्ती मिळवितात.

अभ्यास ३

Construct suitable sentences, using the following verbs :—

(१) लिहू, (२) जातील, (३) बिघडेल, (४) देईल, (५) येतील, (६) भांडाल, (७) सांगेन, (८) होशील, (९) असेल, (१०) आणाल, (११) करतील, (१२) व्हाल.

अभ्यास ४

Translate the following sentences into Marathi :—

(1) I shall start tomorrow. (2) We shall miss the train. (3) He will be fifteen next Monday. (4) The clouds will gather in the sky. (5) She will pity the beggar. (6) The merchant will bear the loss. (7) The tailors in Bombay will go on strike. (8) The fishermen will catch the fish and will bring them home. (9) Will you attend to my question? (10) They will be Ministers after the next election. (11) Will you please give me five rupees? (12) What will people do if every commodity is costly? (13) We shall write a letter and post it today. (14) The teacher will tell a story and you will listen to it. (15) The servants will carry the furniture from the first floor to the second floor.

[*New words* : to start – निघणे; We shall miss the train. – आमची गाडी चुकेल; next – येत्या; to pity – दया करणे; loss – नुकसान (N.), हानी (F.); on strike – संपावर; a commodity – वस्तू; costly – महाग; to bear – सोसणे].

# १३ काळबदल (TRANSFORMATION OF TENSES)

In this chapter, it is proposed to illustrate the transformation of verbs from one tense to another. All the rules in this respect have already been dealt with in previous chapters.

The following two rules deserve a special mention :—

(1) In the case of transitive verbs, the verb in the past tense agrees with the object and the subject is changed to its instrumental case. (2) In the case of the future tense, attention is invited to the conjugation of transitive and intransitive verbs and also to the second person plural of some roots ending in आ, इ, उ, ए, ओ (जा, पि, धु, घे, हो, etc).

We give below three lists A, B, and C. The list 'A' contains sentences having intransitive verbs (अकर्मक क्रियापदे). The list 'B' contains sentences having transitive verbs (सकर्मक क्रियापदे) and the list 'C contains exceptional verbs (अपवादात्मक क्रियापदे).

**List 'A'**

| भूतकाळ<br>*Past Tense* | वर्तमानकाळ<br>*Present Tense* | भविष्यकाळ<br>*Future Tense* |
|---|---|---|
| १. मी माझ्या मित्रावर रागावलो.<br>(I got angry with my friend). | १. मी माझ्या मित्रावर रागावतो.<br>(I get angry with my friend). | १. मी माझ्या मित्रावर रागावेन.<br>(I shall get angry with my friend). |
| २. आम्ही / आपण कार्यालयात गेलो.<br>(We went to the office). | २. आम्ही / आपण कार्यालयात जातो.<br>(We go to the office). | २. आम्ही / आपण कार्यालयात जाऊ.<br>(We shall go to the office). |

| | | |
|---|---|---|
| ३. तू हसलास. (You smiled). | ३. तू हसतोस. (You smile). | ३. तू हसशील. (You will smile). |
| ४. तू रडलीस. (You cried). | ४. तू रडतेस. (You cry). | ४. तू रडशील. (You will cry). |
| ५. तुम्ही / आपण पडला / पडलात. (You fell). | ५. तुम्ही / आपण पडता. (You fall). | ५. तुम्ही/आपण पडाल (You will fall). |
| ६. तो झाडावर चढला. (He climbed a tree). | ६. तो झाडावर चढतो. (He climbs a tree). | ६. तो झाडावर चढेल. (He will climb a tree). |
| ७. ती नाचली. (She danced). | ७. ती नाचते. (She dances). | ७. ती नाचेल. (She will dance). |
| ८. पक्षी उडाले. (Birds flew). | ८. पक्षी उडतात. (Birds fly) | ८. पक्षी उडतील. (Bird will fly). |
| ९. काल शुक्रवार होता. (Yesterday was Friday). | ९. आज शनिवार आहे. (Today is Saturday). | ९. उद्या रविवार असेल. (Tomorrow will be Sunday). |

## List 'B'

| भूतकाळ<br>*Past Tense* | वर्तमानकाळ<br>*Present Tense* | भविष्यकाळ<br>*Future Tense* |
|---|---|---|
| १. मी आंबा खाल्ला. (I ate a mango). | १. मी आंबा खातो. (I eat a mango). | १. मी आंबा खाईन. (I shall eat a mango). |
| २. आम्ही / आपण भाज्या आणल्या. (We brought vegetables) | २. आम्ही / आपण भाज्या आणतो. (We bring vegetables). | २. आम्ही / आपण भाज्या आणू. (We shall bring vegetables). |
| ३. तू काय केलेस ? (What did you do ?) | ३. तू काय करतोस ? (What do you do ?). | ३. तू काय करशील ? (What will you do ?) |
| ४. तुम्ही / आपण चेंडू फेकला / फेकलात. (You threw a ball). | ४. तुम्ही / आपण चेंडू फेकता. (You throw a ball). | ४. तुम्ही / आपण चेंडू फेकाल. (You will throw a ball). |
| ५. त्याने कादंबरी वाचली. (He read a novel). | ५. तो कादंबरी वाचतो. (He reads a novel). | ५. तो कादंबरी वाचील. (He will read a novel). |

| भूतकाळ *Past Tense* | वर्तमानकाळ *Present Tense* | भविष्यकाळ *Future Tense* |
|---|---|---|
| ६. तिने पत्रे लिहिली. (She wrote letters). | ६. ती पत्रे लिहिते. (She writes letters). | ६. ती पत्रे लिहील. (She will write letters ). |
| ७. लोकांनी स्वागत केले. (People welcomed ). | ७. लोक स्वागत करतात. (People welcome). | ७. लोक स्वागत करतील. (People will welcome) |
| ८. गुरुजींनी गोष्टी सांगितल्या. (The teacher told stories ). | ८. गुरुजी गोष्टी सांगतात. ( The teacher tells stories ). | ८. गुरुजी गोष्टी सांगतील. (The teacher will tell stories ). |
| ९. धोब्याने कपडे धुतले. (The washerman washed clothes). | ९. धोबी कपडे धुतो. (The washerman washes clothes). | ९. धोबी कपडे धुईल. ( The washerman will wash clothes ). |

## List 'C'

| भूतकाळ *Past Tense* | वर्तमानकाळ *Present Tense* | भविष्यकाळ *Future Tense* |
|---|---|---|
| १. मुले दूध प्याली. (Children drank milk). | १. मुले दूध पितात. ( Children drink milk) | १. मुले दूध पितील. (Children will drink milk ). |
| २. वडिलांनी मुलाला बोलावले. (Father called the son ). | २. वडील मुलाला बोलावतात. ( Father calls the son) | २. वडील मुलाला बोलावतील. (Father will call the son). |
| ३. लोक भांडण विसरले (People forgot the quarrel ). | ३. लोक भांडण विसरतात. ( People forget the quarrel ) | ३. लोक भांडण विसरतील. (People will forget the quarrel ). |

**अभ्यास १**

Re-write the following sentences in the remaining two tenses :–

(१) आम्ही पेढे खाल्ले. (२) ती पुस्तके वाचते. (३) आज पाऊस पडतो. (४) तुम्ही केव्हा हजर झालात? (५) गाडी आली. (६) तुम्ही कोणता उद्योग करता? (७) आम्ही श्रीमंत होऊ. (८) मुलींनी सामना जिंकला. (९) संपादक

लेख लिहितात. (१०) कर्मचारी संप करतील. (११) तुम्ही का रागावलात? (१२) तुमच्या कुटुंबात किती माणसे आहेत? (१३) ती कोठे राहते? (१४) तुम्ही पुस्तक दिले. (१५) लोक गावाला जातात.

अभ्यास २

Complete the following sentences by using suitable forms of verbs given in the brackets :-

(१) मी उद्या कपडे (धुणे). (२) मुले आता मैदानात (खेळणे). (३) मी काल कपडे (आणणे). (४) काल आकाश निरभ्र (असणे). (५) उद्या थंडी (पडणे) (६) दोन दिवसांपूर्वी मी येथे (येणे) व प्रेक्षणीय स्थळ (पाहणे). (७) परवा माझे पाकीट (हरवणे), म्हणून वडील मला (रागावणे). (८) काल भाजी महाग (होणे), पण दूध स्वस्त (होणे). (९) हल्ली माझा पगार २०० रुपये (असणे); गेल्या महिन्यात तेवढाच (होणे); पुढील महिन्यात तेवढाच (राहणे) (१०) आम्ही उद्या पुण्याला (जाणे) व दोन दिवस (राहणे).

# १४ क्रियाविशेषण अव्यये (ADVERBS)

An adverb is a word which modifies the meaning of a verb, an adjective or another adverb *e. g.*, (१) घोडा जलद धावतो. (२) हा आंबा फार गोड आहे. (३) तो अगदी स्पष्टपणे वाचतो. In sentence No. 1, the adverb जलद modifies the verb धावतो; in sentence No. 2, the adverb फार modifies the adjective गोड; in sentence No. 3, the adjective अगदी modifies the adverb स्पष्टपणे (clearly).

Now read the following paragraph :—

**आज येथे** काम नाही. **उद्या इकडे** या. **तोपर्यंत आसपास** लक्ष द्या. **नेहमी चोहोकडे** पाहा. **उगीच** वेळ दवडू नका. तुम्हांस **खचित** काम मिळेल. **प्रतिदिन** काहीतरी काम करा. **आजकाल** परिस्थिती **फार** चमत्कारिक आहे. **क्षणोक्षणी** काय होईल ते सांगता येत नाही. माणसाने **आमरण** विद्या संपादन करावी. **दैववशात** काहीही होऊ शकेल. **शास्त्रदृष्ट्या** हे तुम्हास खरे वाटणार नाही. पण **यथाशक्ती** प्रयत्न करणे तुमच्या हाती आहे.

[ *New words* : तोपर्यंत (till then); आसपास (nearby, in the neighbourhood); खचित (certainly); प्रतिदिन (every day); क्षणोक्षणी (every moment); आमरण (till death); दैववशात (fortunately); शास्त्रदृष्ट्या (scientifically); यथाशक्ती (according to strength); आजकाल (now-a-days.) ].

The words in the bold type in the above paragraph are adverbs. Adverbs are not generally inflected or declined; hence they are also called indeclinables (अव्यये). They are also called adverbial prepositions (क्रियाविशेषण अव्यये).

The adverbial prepositions are of five kinds :–

(1) *Adverbs of place* (स्थलवाचक क्रियाविशेषणे).— These are of two kinds :

(*a*) स्थितिदर्शक (denoting a place or a spot), *e. g.*, येथे (here); तेथे (there); जेथेतेथे, सर्वत्र (everywhere); जवळ, समीप (near); पुढे, समोर

( before, in the presence of, in front of); खाली (below); मध्ये (within); मागे (behind); पलीकडे (beyond); सभोवती (around).

(*b*) गतिदर्शक (denoting motion to a place or from a place), *e.g.*, इकडून (hence); तिकडून (thence); इकडे (here), तिकडे (there).

(2) *Adverbs of time* (कालवाचक क्रियाविशेषणे).–These are of three kinds :––

(*a*) कालदर्शक (denoting a period or point of time), *e. g.*, आज, उद्या, काल; परवा (two days ago or two days hence); तेरवा (three days ago or three days hence); मग, नंतर (afterwards); सांप्रत (at present); झटकन (instantly); अकस्मात, एकाएकी (suddenly); तत्काळ, तत्क्षणी (immediately); एकदम (at once); शेवटी (at last).

(*b*) सातत्यदर्शक (denoting continuance of time), *e.g.*, नेहमी, नित्य, सर्वदा, सदा (often); सतत (continually); रोज, रोजरोज, रोजच्या रोज, प्रतिदिन (daily); दिवसेंदिवस (day after day).

(*c*) आवृत्तिदर्शक (denoting repetition), *e.g.*, वारंवार (often); रोजरोज (every day); पुनः पुनः (again and again); वेळोवेळी (off and on); क्षणोक्षणी (every moment).

(3) *Adverbs of quantity* (परिमाणवाचक क्रियाविशेषणे) (denoting quantity or measuer), *e. g.*, अत्यंत, अगदी (quite, entirely); किंचित (little); निदान (at least); पुष्कळ (very much); पुरे (enough); काही (some, somewhat); अधिक (more); कमी (less).

(4) *Adverbs of manners* (रीतिवाचक क्रियाविशेषणे) (denoting manners); *e.g.*, असे तसे (so); व्यर्थ (in vain); फुकट (free of charge, gratis), अकस्मात, अचानक (suddenly); निरर्थक (to no purpose); जसे (as); कसे (how); उगाच, उगीच, उगीचच (merely, for no reason); कदाचित (perhaps); एकत्र (together).

(5) *Adverbs of interrogation* (प्रश्नार्थक क्रियाविशेषणे), *e.g.*, केव्हा (when); कोठे (where); कशाला (why); कोणीकडे (where).

according to the context they may be used in, *e.g.*, होय (Yes); खचित (certainly); निःसंशय (undoubtedly); खरोखर (really); मोठ्याने (loudly); अनवाणी (bare-footed) :--

(1) Sometimes nouns are used adverbailly, *e.g.*, तो दहा मैल चालला. (He walked ten miles); तू रात्रीचा कोठे होतास? (Where were you at night?)

(2) Sometimes pronouns are used adverbially, *e.g.*, मुलगा आपल्या आपण घरी आला. (The boy came home of his own accord.)

(3) Adjectives also are adverbially used, *e.g.*, त्याने चांगले वाचले नाही. (He did not read well).

(4) Participles are also sometimes adverbially used, *e.g.*, तो जाणूनबुजून गैरहजर राहिला. (He deliberately remained absent.)

अभ्यास १

Fill in the gaps by using suitable adverbs given at the end :—

(१) तो अहवाल ·········· गोपनीय आहे. (२) माझा त्याने ········ अपमान केला. (३) ·········· आंबे खूप आले. (४) सिंह ·············· मेला नव्हता. (५) मी ·········· सांगितले तरी तो ऐकत नाही. (६) वडिलांनी ·········· पूजा केली. (७) रामदास ·········· ब्रह्मचारी होते. (८) तो ····· निष्काळजी आहे. (९) ती मुंबईहून ·········· आली. (१०) तो पुस्तक ·········· वाचतो. (११) ·········· जागतिक परिस्थिती फार स्फोटक आहे. (१२) पाहुणे ·········· जेवले.

(*Answers* :- आमरण, आजकाल, यथास्थित, यथाशास्त्र, केव्हा, जाणूनबुजून, यंदा, खरोखर, अगदी, वारंवार, आजन्म, कसे.)

अभ्यास २

Give Marathi equivalents for the following :—

(1) Every day. (2) Now-a-days. (3) From the birth. (4) Till death. (5) In the meanwhile. (6) Very loudly. (7) Every moment.

( 8 ) By now. ( 9 ) Really speaking. ( 10 ) Fortunately. ( 11 ) In front of. ( 12 ) Repeatedly.

अभ्यास ३

Translate the following sentences into Marathi :—

( 1) In the meanwhile my friend came to my help ( 2 ) We all are students till death. ( 3 ) These boys rarely studied. ( 4 ) He deliberately avoided the examination. ( 5 ) The serpent was not really dead. ( 6 ) Now-a-days there is a scarcity of sugar. (7) The servant attends to all things roundabout ( 8) He is a very important person. ( 9 ) The swing moves to and fro. ( 10 ) My mother, all of a sudden, left the house. ( 11 ) How did you go to Nagpur? By rail or by road? ( 12 ) How did you solve the puzzle? ( 13 ) When did you pass the degree examination? ( 14 ) He wrote as he pleased. ( 15 ) We never trust a liar.

[ *New words* : In the meanwhile इतक्यात; till death आमरण; rarely क्वचित; to avoid टाळणे; dead मेलेला; a scarcity टंचाई; a V. I. P. अति महत्त्वाची व्यक्ती; all of a sudden एकाएकी; a puzzle कोडे ( N. ); a degree examination पदवी परीक्षा ( F. ); to trust विश्वास ठेवणे; a liar खोटे बोलणारा (Adj.).].

● ● ●

## १५ शब्दयोगी अव्यये (POST-POSITIONS)

A post-position is a word which shows the realation of a noun or a pronoun to some other word in the sentence, *e.g.*, तो खुर्चीवर बसला (He sat in the chair); काही लोक जेवणानंतर सुपारी खातात (Some people eat a betel-nut after meals); आपल्या भावाबरोबर खेळावयास जा (Go to play with your brother).

Now read the following passage :–

महात्माजींची प्रतिमा टेबला**वर** आहे. तिच्या**कडे** पाहा. महात्माजींच्या**मुळे** आपण स्वतंत्र झालो. त्यांच्या शिकवणी**प्रमाणे** आज आपल्याला वागले पाहिजे. त्यांच्या**कडून** आपण पुष्कळ गोष्टी शिकलो. त्यांच्या**सारखा** लोकप्रिय नेता जगात झाला नाही. गांधीजींच्या **बरोबर** काम करताना आनंद वाटत असे. त्यांच्या**खेरीज** दुसरा कोणीही भारत स्वतंत्र करू शकला नाही. भारता**वर** त्यांचे अफाट प्रेम होते. शेवट**पर्यंत** ते देशाच्या हिता**साठी** झटले.

The words in the bold type above are post-positions.

Post-positions are of various kinds, depending on the relations they signify ;

(1) Denoting time (कालदर्शक)–आत (in, before); पुढे, नंतर (after); आधी, अगोदर, पूर्वी (before); पर्यंत (until), *e.g.*, संध्याकाळ**पर्यंत** घरी ये. (Come home till evening).

(2) Denoting place (स्थलदर्शक)– आत (in); मध्ये (in between); बाहेर (out); पाशी, समीप, जवळ (near); समक्ष, पुढे, समोर (before, in the presence); मागे (behind); खाली (under); वर (on); अलीकडे (on this side); पलीकडे (beyond), *e.g.*, माझ्याजवळ कोणी येऊ नका (Let no one come near me).

(3) Denoting motion to or from a place (गतिदर्शक)—आतून (from within); खालून (from below); मधून (from the middle); वरून (from above); पर्यंत (till); कडे (at, towards); पासून (from), *e. g.*, पुलावरून जा (Go over the bridge).

(4) Denoting iustrumentality (करणवाचक)-कडून, द्वारा, हातून, हाती (by or through), *e. g.*, त्याच्या हाती निरोप पाठवा (Send a message through him).

(5) Denoting ability (योग्यतादर्शक)—सम, समान, सारखा (like); जोगा, जोगता (suitable); *e. g.*, महात्मा गांधींसारखा पुढारी होणार नाही (There will be no leader like Mahatma Gandhi).

(6) Denoting contradiction (विरोधवाचक)—विरुद्ध, उलटे (against), *e. g.*, नियमाविरुद्ध कोणतीही गोष्ट करू नका (Do not do anything against the rules).

(7) Denoting co-existence (साहचार्यवाचक)-बरोबर, सह, सकट, संगे, सहित (with), *e. g.*, तो पत्नीसह गावाला गेला (He went to the vlllage with his wife).

(8) Pure post-positions (शुद्ध शब्दयोगी अव्यये)—च, मात्र, देखील, पण, फक्त, *e. g.*, फक्त दोन रुपये द्या (Give only two rupees).

(9) Miscellaneos (संकीर्ण)—साठी (for); विषयी (about); भोवती (around); पुरता (sufficient); खेरीज, शिवाय, वाचून (without, except); पैकी (out of).

Sufficient illustrations of the post-positions have been given in the Chapter on cases.

(1) The post-position serves the same purpose as the case ending. The noun to whicn it is joined assumes its सामान्यरूप (oblique form) before the post-position, *e. g.*, पर्वतावर, इमारतीजवळ, घरापासून.

(2) Sometimes the noun, in question, may not assume the सामान्यरूप. Words denoting time come under this category, *e.g.*, दुपारपर्यंत, सकाळपर्यंत.

(3) Nouns and pronouns to which post-positions are joined either take the सामान्यरूप or the सामान्यरूप s of its genetive form, *e. g.* रामाजवळ or रामाच्याजवळ, त्याकरिता, or त्याच्याकरिता, त्यापासून or त्याच्यापासून.

### अभ्यास १

Fill in the gaps in the following sentences with suitable post-positions given at the end :--

(१) घरा ........ बाग असणे चांगले. (२) सीते ........... राम वनात गेला. (३) बंगाली बाबू कलकत्या ........... रहात होता. (४) घोड्या ........... तबेला असतो. (५) आणि ........... कधी कधी 'व' वापरतात. (६) नियमां ........... चालावें. (७) बाबू गेनू ........... दुसरा कोणी हुतात्मा झाला नाही. (८) इमारतीच्या ........... ओढा आहे. (९) माझ्या ........... ही गोष्ट सांग. (१०) त्याच्या ........... हे कोणीही काम करणार नाही. (११) मुले वर्ष ........ अभ्यास करतात. (१२) या चित्रपटास ........... प्रौढांना प्रवेश मिळेल. (१३) तापा ........... तोंड कडू झाले आहे.

(Answers : साठी, शिवाय, फक्त, मध्ये, भोवती, मुळे, जवळ, समक्ष, खेरीज, भर, ऐवजी, सह, प्रमाण.).

### अभ्यास २

Give the Marathi renderings of the following :—

(1) With children. (2) Like Pandit Nehru. (3) Before Tuesday. (4) For the country. (5) In the interest of the public. (6) Opposite to this house. (7) Regarding a friend. (8) After the arrival. (9) In your presence. (10) Near the office. (11) Against rules. (12) All the year round. (13) Owing to illness. (14) On behalf of my friend. (15) Through his son. (16) In place of sugar. (17) Except rice. (18) Different from that. (19) But for him. (20) As for me.

### अभ्यास ३

Translate the following sentences into Marathi :—

(1) He went to the theatre, along with his wife.
(2) We reached the station before the arrival of the train.
(3) The grocer gave salt instead of sugar.
(4) They sent a message through their servant.
(5) There is a river near my house.
(6) We are six, including myself.

(7) He told everything in my presence.
(8) People acted against their will.
(9) Virtue is the opposite of vice.
(10) The child fell from the third floor.
(11) The officer transferred the clerk in the public interest.
(12) Poona, too, is a big city.
(13) But for my friend, all attended the marriage function.
(14) My son studied all the year round.
(15) Owing to the sudden death of the popular leader, all people became sad

[*New words* : A Theatre – सिनेमागृह, चित्रपटगृह, नाट्यगृह (N.); arrival– आगमन (N.); a message – संदेश (M.); a will – इच्छा (F.); मृत्युपत्र (N.); against their will – आपल्या इच्छेविरुद्ध; opposite of च्या विरुद्ध; च्या उलट; from the third floor – तिसऱ्या मजल्यावरून; public interest – जनहित (N.); owing to the sudden death – अचानक मृत्यूमुळे.].

• • •

## १६ उभयान्वयी अव्यये (CONJUNCTIONS)

A conjunction is a word which joins together sentences and sometimes words, *e.g.*, राम वनवासात गेला व भरत अयोध्येत आला (Ram went to the forest and Bharat came to Ayodhya). They generally make sentences more compact, *e.g.*, श्री. हजारे व श्री. नायडू उत्तम खेळाडू आहेत (Shri Hazare ane Shri Naidu are the best players). This sentence is a short way of saying : श्री. हजारे उत्तम खेळाडू आहेत व श्री. नायडू उत्तम खेळाडू आहेत Sometimes the conjunction joins words only, *e.g.*, राम व लक्ष्मण हे भाऊ होते (Rama and Laxman were brothers).

The conjunctions are classified thus —

(1) Copulative Conjunctions (समुच्चय बोधक). - These unite sentences in form as well as in meaning. Examples : आणि, आणखी, व (and); ही, देखील, पण (also); म्हणजे (That is). सफरचंद व डाळिंब ही फळे होत (An apple and a pomegranate are fruits).

(2) Disjunctive (विकल्प बोधक).-- These join sentences together but disconnect their meaning. Examples : वा, किंवा, अथवा, अगर (or). तू आलास अथवा तुझा भाऊ आला तरी चालेल (It will do if you or your brother comes).

(3) Adversative (न्यूनाधिक्य बोधक). -- These connect sentenses, but express the contrariety of senses. Examples : पण, परंतु, किंतु (but); यद्यपि, जरी (Though); तरी, तथापि (still). तानाजी पडला पण सूर्याजी घाबरला नाही (Tanaji fell but Suryaji was not afraid).

(4) Causative or effective (कारणदर्शक and परिणामदर्शक) – These state a reason or a purpose. Examples : कारण, कारण की (because, in order that); म्हणून (therefore); यास्तव, याकरिता (therefore); आता (now, in the present circumstances). त्याने खूप अभ्यास केला म्हणून तो परीक्षेत उत्तीर्ण झाला (He was successful at the examination because he studied hard).

(5) Conditioned (संकेतदर्शक).— This expresses a condition or a supposition. Examples : जर (if) with the connective तर (then); जरी-तरी (although-still); नाहीतर (otherwise); म्हणजे (then); की (then). जर चांगले काम करशील तर पदोन्नती मिळेल (If you work well you will get promotion).

(6) Showing features (स्वरूपदर्शक).— These express the features. Examples : म्हणजे (means, that is to say); म्हणून (as). विद्यालय म्हणजे विद्या मिळण्याचे ठिकाण (A school is a place of learning).

(7) Objective (उद्देशदर्शक).— These denote the object or the intention. Examples : म्हणून, सबब (therefore). मला हे गणित सुटत नाही, म्हणून मी तुझ्याकडे आलो आहे (I cannot solve this example, therefore (that is why) I have come to you).

**अभ्यास १**

Pair the following parts (stated under A and B) suitably :—

| | A | B |
|---|---|---|
| (१) | मंत्रालय म्हणजे | म्हणून तो मरण पावला. |
| (२) | तुम्ही बसने जा | शंभर पैसे. |
| (३) | अधीक्षक व लिपिक | पण काही उपयोग झाला नाही. |
| (४) | माझी पत्नी येईल | माझी नोकरी गेली तरी हरकत नाही. |
| (५) | तो फार आजारी आहे | शासन-निर्णय निघण्याचे ठिकाण. |
| (६) | त्याच्या पोटात विष गेले | हे कर्मचारी आहेत. |
| (६) | जर तिला भूक लागली | अथवा माझा मुलगा येईल. |
| (८) | रामशास्त्री म्हणाले | तर तिने थोडे खावे |
| (९) | एक रुपया म्हणजे | अथवा गाडीने जा. |
| (१०) | मुलाने खूप अभ्यास केला | तेव्हा त्याला रुग्णालयात न्या. |

**अभ्यास २**

Fill in the gaps in the following sentences by means of suitable conjunctions given at the end :—

(१) ती म्हणाली .................. मला हे पुस्तक फार आवडले.
(२) नोकरी पहावी .................. मी मुंबईस आलो आहे.
(३) .................. तू नीट वागशील .................. लोक तुला चांगला म्हणतील.

(४) टंकलेखक ............... टंकलेखिका चालेल.

(५) अधीक्षकांनी मला सूचना दिल्या ............... ते सचिवाकडे गेले.

(६) मला सिनेमाला जावेसे वाटते ............... मजजवळ पैसे नाहीत.

(७) तुम्ही निघालात ............... मी निघालो.

(८) दुग्धालय ............... दूध मिळण्याचे ठिकाण.

(९) तुकाराम सन्त होते, रामदास ............... सन्त होते.

(१०) औषध घेतले ............... मी बरा झालो.

(Answers : पण, अथवा, म्हणून, म्हणजे, की, जर-तर, आणि.)

अभ्यास ३

Translate the following sentences into Marathi : (1) I like to go to Bombay, but I have no money. (2) The postman knocked at the door and gave these letters. (3) A dispensary is a place to get medicine. (4) You either write something or read something. (5) The pattient succumbed to his injuries because the doctor did not arrive in time. (6) Typhoid and Cancer are bad diseases. (7) Neither you nor your brother came. (8) We drink milk because it is nutritious. (9) She studied hard but failed. (10) The office requires either a typist or a steno-typist.

[*New words* : To knock at the door — दार ठोठावणे; A dispensary— औषधालय (N.); Typhoid— विषमज्वर (M.); Cancer— कर्करोग (M.); Nutritious — पौष्टिक (Adj.); Steno-typist— लघुटंकलेखक (M.).]

● ● ●

# १७ केवलप्रयोगी अथवा उद्‌गारवाचक अव्यये
## (INTERJECTIONS)

An interjection is a word that expresses a sudden emotion of the mind, *e.g.*, शाबास ! सैनिकांनी खरोखर फार चांगले काम केले (Bravo ! The soldiers have done a fine job indeed). These words have no grammatical relation with the sentence. They are the sudden expressions of powerful feelings. Please read the following paragraph : –

**अबब** ! केवढी गर्दी ही. **अहो** ! केवढी आग लागली. **अरेरे** ! आत किती माणसे असावीत ? **शाबास** ! तो पहा एक धीट पुरुष वर गेला. **वाहवा** ! त्याने पहा एका लहान मुलाला वाचविले. **आई ग** ! ती कोणाची हाक ऐकू येत आहे. **बापरे** ! ती स्त्री हंबरडा फोडत आहे. **ओहो** ! त्याने तिलाही वाचवले. **अरेरे** ! पहिला सबंध मजला तर खाली आला. **ठीक** ! ते पहा अग्निशामक दल आले. **शाबास** ! दलातील सर्व अधिकाऱ्यांनी पराकाष्ठा केली. **वाहवा** ! **भले शाबास** ! त्यांनी सर्वांचे प्राण वाचविले.

The words in the bold type in the above passage are interjections. They express the sudden emotions of the mind such as joy, grief, admiration, etc. Naturally interjections can be classified according to the emotions they express :

(1) Expressing joy (हर्षद्योतक).— ओहो, आहा, वा, वा, वाहवा, अरे वा (Oh). वा ! शास्त्रीजींनी फार मोठी कामगिरी केली.

(2) Expressing grief or sorrow (शोकद्योतक).— हाय रे, आई ग, अरेरे, देवा रे, हरहर, रामराम. अरेरे ! मादुंग्याला केवढा अपघात झाला.

(3) Expressing surprise (आश्चर्यद्योतक).— अहा, अबब, अरे बापरे, ओहोहो, अरेच्या. अरे बापरे ! केवढी मोठी आग लागली.

(4) Expressing appreciation or approbation (प्रशंसाद्योतक).— ठीक, वाहवा, भले, शाबास, धन्य. वाहवा ! पतौडीने शतक काढले.

(5) Expressing consent (अनुमतिद्योतक).— ठीक, बरे, होय, हं. ठीक ! उद्या याच वेळेस या.

(6) Expressing disagreement or contradiction (विरोधद्योतक).— छट्, अंहं, उंहूं, छे, छे. छे, छे ! मी असले काम कधीच करणार नाही.

(7) Expressing contempt (तिरस्कारद्योतक).— छत्, हट, छे, भलतेच, थू. भलतेच ! मी असे कधीच बोललो नाही.

(8) Expressing acceptance (स्वीकारद्योतक).— ठीक्, हं, हां होय, बरे. होय ! उद्या नक्की भेटेन.

(9) Expressing address (संबोधनद्योतक).— अग, अरे, ए, हे अगो. अरे ! हे बघ, उद्या एक लिटर जास्त दूध आण हं.

Besides these there, is one more type of interjections, not included in the list mentioned above. These are words which are not necessary to make up the sense of a sentence, but are sometimes used to fill a gap or are used for grace.

These are called पादपूरणार्थक interjections, *e.g.*, आपला, बरीक, म्हणे, की रे. (१) अहो ! महागाईभत्ता म्हणे वाढला. (२) मी आपला म्हणालो, "देईन शंभर रुपये."

**अभ्यास १**

Fill in the gaps in the following sentences with suitable interjections selected from the list cited above :—

(१) ... ! मी असे वाईट काम कधीच करणार नाही. (२) ...... ! तू परीक्षेत चांगले यश मिळविलेस. (३) ............ ! काय ही महागाई. (४) ......... ! तुम्ही म्हणता ते मला पटत नाही. (५) ......... ! हे पाहा, उद्या मंडळी चहाला येणार आहेत.

**अभ्यास २**

Translate the following sentences into Marathi :—

(1) Well, what is your opinion ? (2) What a beautiful natural scenery ! (3) Yes, we will go to Poona, the day after. (4) O ! no, I shall never undertake such an unpleasant task. (5) Bravo ! you are really a good girl. (6) Alas ! my friend is no more. (7) Hallo ! what are you writing ? (8) Ah ! was he here ? (9) Hush ! please do not make a noise, (10) What a terrible accident ! (11) How of beautiful ! (12) What superb acting ! (13) How very nice of him !

[*New Word's* An opinion—मत (N.); natural scenery—निसर्गदृश्य (N. or निसर्ग देखावा (M.); the day after— परवा; to undertake—पत्करणे, घेणे, स्वीकारणे; to be no more— हयात नसणे.]

# १८ वर्तमानकाळ व त्याचे प्रकार ( THE PRESENT TENSE AND ITS VARIETIES )

In this chapter it is proposed to deal with the varieties of the present tense in Marathi. There are four ways in which the Present Tense is used. (1) The simple present or the present indefinite (साधा वर्तमानकाळ ) as expressed in (*a*) नोकर काम करतो, (*b*) वडील मुलावर रागावतात (The father gets angry with the son). This use has been dealt with in the first chapter. (2) The present continuous (अपूर्ण वर्तमानकाळ) as expressed in (*a*) मुलगा खेळत आहे (The boy is playing), (*b*) धोबी कपडे धूत आहे (The washerman is washing clothes). (3) The present perfect ( पूर्ण वर्तमानकाळ ) as expressed in (*a*) आम्ही पत्र लिहिले आहे (We have written a letter), (*b*) नोकराने भाजी आणली आहे (The servant has brought vegetables). (4) The habitual present (रीति वर्तमानकाळ) as expressed in (*a*) मासे समुद्रात राहात असतात (The fish live in the sea), (*b*) आम्ही रोज व्यायाम करीत असतो (We take exercise every day).

We now take up these varieties in their order.

(*1*) *Simple Present* (साधा वर्तमानकाळ) : This has already been dealt with in the first chapter.

(2) *The Present Continuous* (अपूर्ण वर्तमानकाळ) : This represents an action as going on at the time of speaking; it thus denotes an incomplete action. It is also known as present progressive. From the two examples given above, *viz.* (१) मुलगा खेळत आहे and (२) धोबी कपडे धूत आहे, we can easily distinguish this from the simple present. The simple present contains a simple verb as in नोकर काम करतो, वडील रागावतात; whereas in the present continuous you will find compound verbs such as खेळत आहे, धूत आहे. In such compound verbs, *e. g.*, खेळत आहे the first verb is the principal verb (खेळणे) and the second is an

auxiliary verb (असणे). The compound verb is formed by dropping णे of the verb. *e.g.* खेळणे— णे=खेळ and then by adding त to the root, *e.g.*, खेळ + त = खेळत; and then by adding the appropriate forms of the verb असणे (आहे, आहोत, आहेस) etc. the auxiliary verb and not the principal agrees with the subject.

We give below the complete forms of the verb बसणे.

बसणे (to sit)

| | *Singular* | *Plural* |
|---|---|---|
| Ist person– | मी बसत आहे (M. F.)<br>(I am sitting) | आम्ही/आपण आहोत (M. F.)<br>(We are sitting) |
| 2nd person– | तू बसत आहेस (M. F.)<br>(Thou are sitting) | तुम्ही/आपण बसत आहात (M. F.)<br>(You are sitting) |
| 3rd person– | तो/ती/ते बसत आहे<br>(M. F. N.)<br>(He/She/It is sitting) | ते/त्या/ती बसत आहेत<br>(M. F. N.)<br>(They are sitting) |

It will be seen that the above forms are common to all genders. Intransitive verbs धावणे, चालणे, रडणे, हसणे रागावणे, भांडणे yield similar forms as those mentioned above, *e.g.*, मी धावत आहे. आम्ही चालत आहोत; तू रडत आहेस, ते भांडत आहेत.

Some verbs such as करणे, ठेवणे, आणणे, पाठवणे, दाखवणे, ढकलणे, विसरणे, ठरवणे, काढणे, जिंकणे, ऐकणे and mostly transitive verbs except बोलणे, म्हणणे, सांगणे, चालणे, बघणे optionally take ई before त, *e, g.*, आणत, आणित करत, करीत; ढकलत, ढकलीत; etc. Transitive verbs ending in आ, ई, ऊ, ए do take त only, *e. g.* गात, पीत, धूत, घेत, देत.

A few examples of sentences containing the verb in the present continuous are given below :–

१. मी कपडे धूत आहे (I am washing clothes).

२. आम्ही फुले तोडीत/तोडत आहोत (We are plucking flowers).

३. तू गाणे म्हणत आहेस (You are singing a song).

४. तुम्ही भांडत आहात (You are quarrelling).

५. तो चित्र काढत/काढीत आहे (He is drawing a picture).

६. ती केस विंचरते आहे [She is combing (her) hair].

७. ते रांगत आहे (It is crawling).

८. ते भाषण ऐकत आहेत (They are listening to a talk).

९. त्या चित्रपटगृहात जात आहेत (They are going to the theatre).

१०. ती खेळत आहेत (They are playing)

**अभ्यास १**

Convert the verbs in the following sentences in the present continuous and re-write them :-

(१) मुलगा अभ्यास करतो. (२) वडील कार्यालयात जातात. (३) पत्नी साडी आणते. (४) लोक टाळ्या वाजवतात. (५) मी फुलांचा वास घेतो. (६) आम्ही आकाशवाणीवर बातमी ऐकतो. (७) तुम्ही चहा पिता. (८) स्त्रिया तांदूळ निवडतात. (९) तू आभार मानतोस. (१०) मूल हसते.

**अभ्यास २**

Translate the following sentences into Marathi :—

(1) A potter is talking to his son. (2) I am Writing a letter to my father. (3) We are going for a walk. (4) People are looking at the chief guest. (5) She is making a garland. (6) Fishermen are caching fish. (7) My sisters are going to Nagpur. (8) The train is leaving. (9) You are still sleeping ! (10) You are leaving this house.

(3) *The Present Perfect Tense* (पूर्ण वर्तमानकाळ) : The present perfect denotes an action that has just been completed. (१) त्याने उदाहरण **सोडवले आहे.** (He has solved the example) (२) तुम्ही आंबे **खाल्ले आहेत** (You have eaten mongoes). (३) मूल शाळेत **गेले आहे** (The child has gone to school). (४) मी पत्रे **लिहिली आहेत** (I have written letters). (५) तू घरी **बसला आहेस** (You have sat at home). (६) लोकांनी राष्ट्रपतींचे स्वागत **केले आहे** (People have welcomed the President.)

The verbs in the bold type in the above sentences are in the present perfect tense.

From all these examples it will be seen that the present perfect is formed by adding auxiliary verbs such as आहे, आहेत, etc, to the main verb in the Past Tense.

Like the present continuous, the present perfect has also a compound verb, such as खाल्ले आहेत, बसले आहेत, लिहिले आहेत. In all these verbs the first mentioned खाल्ले, बसले, लिहिले are the principal verbs in the Past Tense, the next mentioned आहेत, आहेस are the auxiliary verbs and they are the forms of the verb असणे. All rules applicable for converting a verb into the Past Tense are applicable here, *e.g.,* (1) Changing the subject to the instrumental case, (2) The transitive verb (with some exceptions) agreeing with the object, (3) Intransitive verbs and some transitive verbs agreeing with the subject.

We give below some sentences containing the verb in the present erfect :—

(१) अधीक्षकांनी मसुदा तपासला आहे (The Superintendent has examined the draft).
(२) आम्ही दुःख विसरलो आहोत (We have forgotten the sorrow).
(३) कर्मचारी आज उशिरा आले आहेत (The staff has come late today).
(४) तिने चहा केला आहे (She has prepared tea).
(५) नुकताच खूप पाऊस पडला आहे (It has just rained heavily).
(६) माळ्याने झाडांना पाणी घातले आहे (The garadener has watered the trees).
(७) चालकाने गाडी चालू केली आहे (The driver has started the train).
(८) त्यांनी अभ्यास केला आहे (They have studied).
(९) त्यांनी इमारती पाहिल्या आहेत (They have seen the buildings).
(१०) कारखानदाराने यंत्रे आणली आहेत (The factory owner has brought the machines).

अभ्यास १

Convert the verb in the following sentences into the presen t perfec tense and re-write them:-

(१) आम्ही चहा पितो. (२) मुले धावतात. (३) नोकर झोपतो. (४) मी कपडे धुते. (५) सचिव रागावतात. (६) मूल उड्या मारते. (७) आम्हाला हसू येते. (८) भाऊ भाजी आणतो. (९) डेक्कन क्वीन साडे दहा वाजता येते. (१०) चिकित्सक औषधे देतात.

